

श्री

# सिंहासनबत्तिशी.



हें पुस्तक
गोपाळ नारायण आणिं कंपनी, बुकसेलर्स,
यांनीं आपल्या छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केलें.

मुंबई.

१८८७.

श्री

# सिंहासन बत्तीशी.

श्रीमंत प्रौढप्रताप शौर्यौदार्याद्यनेक गुणविराजमान श्रीभोजराजा धारानगराचेंठायीं राज्य करीत असतां कोणे एकेसमयीं अवंती नगराजवळ एका ब्राह्मणानें नवी भूमी साधून शेत पेरिलें होतें तें आलें ते समयीं त्याचा संरक्षणाकारितां शेतामध्यें माळा करून तो ब्राह्मण त्याजवर नित्य बसत असे. त्याणें जे समयी वरतें बसावें ते समयीं त्याची बुद्धि मोठी उदार व्हावी. आणि खाली आला असतां पुनः पूर्ववत् व्हावी. हा चमत्कार अनुभवून त्या ब्राह्मणानें जाऊन भोजराजास सांगितलें. तेव्हां मोठें आश्चर्य मानून राजा त्या ब्राह्मणा बरोबर शेतांत येऊन माळ्यावर चढला. त्या वेळेस त्यास असें वाटलें कीं, सर्व जनांचें दरिद्र दूर करावें. नंतर खालीं येऊन पाहतो तों ती बुद्धि नाहीं हा प्रत्यक्ष बुद्धिभेदाचा अनुभव घेऊन राजानें मनांत विचार केला कीं; हा भूमीचा गुण किंवा येथें कांहीं वस्तु आहे तिचा गुण हें पहावें नंतर त्या ब्राह्मणास बहुत द्रव्य देऊन राजानें तें शेत घेतलें आणि खणिलें तों रत्नखचित चंद्रकांत मण्याचें सिंहासन ज्यास बत्तीस रत्नपुतळ्या जडल्या आहेत असें पाहिलें तें मोठे प्रयासानें बाहेर काढून आपले नगरांत आणिलें आणि राजमंडपांत ठेविलें मग अनेक तीर्थोदकें, अष्टोत्तरशत औषधि, छत्र, चामर, खड्ग, इत्यादिक राज्याभिषेक सामग्री सिद्ध करवून सुमुहूर्तीं श्रीभोजराजा त्या सिंहासनावर बसूं लागला तेव्हां त्याजवरील जयानामें रत्नपुतळी मनुष्यवाणीनें बोलूं लागली. हे भोजराजा, ज्याचें औदार्य फार असेल त्याणें या सिंहासनावर बसावें. इतरास अधिकार नाहीं. असें तिचें वाक्य ऐकून भोजराजा बहुत विस्मित होऊन तिला पुसूं लागला, कीं, मी याचकांस लाखो रुपये सहज देतों मजहून दुसरा उदार

कोण आहे? तें ऐकून त्याएतळीनें उत्तर केलेंकीं जो आपुले आपली स्तुति करितो तो लघुत्व पावतो या विषयीं वचनः--

परैःप्रोक्तागुणायस्यानिर्गुणोपिगुणीभवेत् ॥ इं-
द्रोपिलघुतांयातिस्वयंप्रख्यापितैर्गुणैः ॥ १ ॥

दुसऱ्यांनी ज्याच्या गुणांची स्तुति केली तो पुरुष अल्पगुणी असला तरी थोरी पावतो आणि इंद्रही जरी आपला थोरपणा आ मुखानें वर्णित आहे तर तो लघुत्व पावतो. तें ऐकून भोजराजा यमान झाला. नंतर ही रत्नांची पुतळी मनुष्यासारखें बोलते हें अ मानून तिला पुसतो. हें कोणाचें सिंहासन व याजवर बसणाराचें दार्य कसे होतें तेंसांग? याप्रमाणे राजाचें बोलणें ऐकून जयापुतळ भा सांगूं लागली:—

उज्जनी नागरींत भर्तृहरी राज्य करीत असतां कोणी एक ब्र देवी जवळ तप करीत होता, त्यास देवी प्रसन्न होऊन वर माग ह ली तेव्हां त्या ब्राह्मणानें अमरत्व मांगितलेंअसतां भवानीनें ए एक फळ देऊन बोलली कीं, हें फळ जो खाईल तो अमरहोईल. नंत फळ घेऊन ब्राह्मण घरास आला. आणि विचार करूं लागला कीं, रिद्री मी अमर झालोंतर फार दिवस भिक्षा मागावी लागेल. यास्त फळ राजास द्यावें ह्मणजे तो बहुत दिवस पृथिवीचें पालन करील. सा निश्चय करून ब्राह्मणानें अति आदरानें तें फळ भर्तृहरीस दि आणि आपलें वर्तमान सांगितलें तें ऐकून राजानें बहुत द्रव्य ब्राह्म देऊन तें फळ आवडीनें आपल्या स्त्रीस दिलें तिणें आपल्या जा दिलें जारानें आपल्या वेश्येस दिलें तीवेश्या राजानें राखिली हे

राजास नेऊन दिलें त्याणें तें फळ पाहून चौकशी केली तेव्हां वर्तमान कळलें मग पश्चात्ताप पाऊन बोलला:—

यांचिंतयामिसततंमयिसाविरक्तासाचान्यमिच्छति-
जनंसजनोन्यसक्तः ॥ अस्मत्कृतेतुपरितुष्यतिका-
चिदन्याधिकृतांवतंचमदनंचइमांचमांच ॥ २ ॥

अर्थ—मी जिचें चिंतन करितों ती मला सोडून दुसऱ्यावर प्रीति क-
तोही दुसऱ्या स्त्रीची इच्छा करितो. तो स्त्री माझेठायीं प्रीति करिते
ात् त्या स्त्रीला, त्या पुरुषाला अशी प्रीति उत्पन्न करणाऱ्या मद-
ग, ह्यास्त्रीला आणि मलाही धिक्कार असो. या प्रमाणें सर्वांचीं निं-
करून तें फळ त्याणें आपणच भक्षिलें आणि त्यातिटकाऱ्यानें
य सोडून वनवासास गेला. मग त्याचेठिकाणीं प्रधानांनी जो राजा
वावा तो वेताळानें मारावा. या प्रमाणें बहुत राजे मारिले हें वर्तमा-
र्तृहरीचा धाकटा बंधु विक्रम देशांतरीं गेला होता त्यास कळलें. ते
थीं तो सामान्य पुरुषाचा वेष धरून उज्जनीस आला. आणि प्रधा-
: विचारूं लागला कीं, येथें कोणी राजा नाहीं याचें कारण काय?
ां त्याणें वेताळाचें वर्तमान सांगितलें तें ऐकून विक्रम ह्मणाला मला.
यपदीं बसवाल तर मी हें राज्य चालवीन. तेव्हां प्रधानानें विचार
ा कीं, हा कोणी मोठा धैर्यवान् आहे; ह्मणून असें भाषण करितो.
यास राज्याभिषेक करावा. असा निश्चय करून त्यांहीं त्यास राज्य
स्थापिलें मग त्याणें सायंकाळ पर्यंत राज्य कारभार करून रात्रीं
ा प्रकारचें अन्न सिद्ध करवून आपल्या पलंगाजवळ ठेविलें आणि
ण तरवार घेऊन जागत बसला. इतक्यांत तेथें वेताळ आला त्यास
न राजा बोलतो, हे वेताळा, हें बहुत प्रकारचें अन्न तुजसाठीं ठे-

विलें आहे तें आधीं खाऊन मग मला खा. तें ऐकून वेताळानें
भक्षिलें आणि तितक्यांतच तृप्त होऊन आपल्या ठिकाणी गेला.
वसापासून वेताळ नित्य नेमानें अन्न खाऊन जात असे. एके
विक्रमानें त्यास पुसले कीं, तुझी शक्ति आणि ज्ञान किती आहे
ग? तेव्हां वेताळ ह्मणाला मीजें इच्छीन तें करीन. आणि भ
भविष्य, वर्तमान; कळतें. तें ऐकून विक्रम ह्मणतो कीं, माझें
ष्यांत पांच वर्षें उणीं अथवा अधिक कर बरें? वेताळानें उत्तर
हें कोणाचे स्वाधीन नाहीं. असें बोलून आपले ठिकाणीं गेला
दिवशीं विक्रमानें अन्न ठेविलें नाहीं तेव्हां वेताळ रागें भरून
कीं, अरे. आज कां अन्न ठेविलें नाहींस तेव्हां विक्रम बोलला
ह्यानें माझें आयुष्य उणें अथवा अधिक करवत नाहीं मग तुल
बळी उगाच कशा साठीं द्यावा? तुझी इच्छा असेल तर युद्ध
द्ध हो. या प्रमाणें भाषण करून विक्रम हातांत तरवार घेऊन
उभा राहिला. हें पाहून वेताळ ह्मणाला विक्रमा; तुझ्या धैर्यानें
तुष्ट झालों. यास्तव तू कांहीं वर माग. विक्रम बोलला ज्या वे
स्मरण करीन त्यावेळेस येऊन माझें कार्य करावें तें मान्य क
ळ गेला. मगमोठ्या समारंभानें विक्रमानें आपणास राज्या भि
विला, आणि राज्य करूं लागला तों एके दिवशीं सिद्धसेनन
उज्जनीस येऊन राजास आपण आलों असें कळविता झाला. व
क्रमानें भेटीच्या अगोदरच त्यास चवदा लक्ष रुपये आणि न
दानपत्र पाठवून सेवकांस सांगितलें कीं, आणखी कांहीं कवीचे
असली तर त्यास सभेस घेऊनया. याप्रमाणें राजाज्ञा ऐकून दू
पये व ग्राम पत्रक कवीस दिलें असतांही कवि सभेस गेला.
पूर्वेस मुख करून बसला होता. ते समयीं कवीनें हा श्लोक ह्म

## कथा २ री.

कोणे समयीं विक्रम राजा सभेस बसलाअसतां एक दरिद्री ब्राह्मण
ने उगाच उभा राहिला. तेव्हां, प्रधानांनी विनंती केली कीं, हा-
त दरिद्री आहे ह्मणून आपल्याजवळ आला आहे. तें ऐकून
ानें त्यास लक्ष रुपये दिले. तेव्हां ब्राह्मण संतुष्ट होऊन त्याणें
क ह्मटला—

संग्रहेणकुलीनानांराज्यंकुर्वंतिपार्थिवाः ॥ आ-
दिमध्यावसानेषुनत्यजंति वतेनृपान् ॥ १ ॥

र्थ—हे राजा कुलीन पुरुषांचा संग्रह करून राजे राज्य करितात. ह्म-
ा ते पुरुष राजांस कधींही सोडीत नाहींत याविषयीं कथा सांगतों
वणकर. विशाल नगरींत नंदराजा होता तो भानुमती स्त्रीच्या स्वरूपास
हित होऊन राज्य कारभार सोडिता झाला. तेव्हां त्यास बहुश्रुत
धानानें विनती केली कीं, हे राजा, गुरु, वैद्य आणि प्रधान यांणीं
वळ मर्जी सारिखें बोलुं नये. जें खरें असेल तें सांगावें आशी नीती
ाहे; ह्मणून बोलतों ऐक. आपण सभेस यावयाचें सोडिलें हें समजून
त्रू राज्यांत बहुत उपद्रव करूं लागले. असें प्रधानाचें भाषण ऐकून नं
राजा ह्मणतो तूं खरें सांगतोस परंतु भानुमतीस सोडून मला क्षण भ-
ही रहावत नाहीं यास कांहीं उपाय करशील तर मी दरबारीं येईन
असें राजाचें बोलणे ऐकून बहुश्रुत प्रधानानें चिताऱ्या कडून भानु
तीचें चित्र काढवून दाखविलें, तें राजानें शारदानंद गुरूचे हातीं
देलें. तें पाहून त्याणें सांगितलें हें चित्र भानुमती सारिखेंच खरें; परंतु
तच्या मांड्यांवर चिन्ह आहे तें येथें नाहीं. असें त्याचें वाक्य ऐकून
ंदराजास फार राग येऊन प्रधानास आज्ञा केली कीं, शारदानंदास

अरण्यांत नेऊन मारून टांक. ती आज्ञा मान्य करून प्रधानानें त्यास आपले घरीं नेलें. आणि विचार केला कीं. भानुमतीचे मांडीवरील चिन्ह याणें अंतर्ज्ञानानें सांगितलें तें न जाणून राजाचे मनांत दुष्ट बुद्धि आली आणि यास मारावयास आज्ञा केली; परंतु मारला असतां प्रभूस पातक लागेल यास्तव लपवून ठेवावा. असा निश्चय करून शारदानंदास राजाज्ञा सांगून तळघरांत लपवून ठेविला आणि मारिलें असें लटकेंच राजास सांगितलें नंतर एके दिवसीं राज पुत्र विजयपाळ अरण्यांत शिकारीस गेला. तेथें मोठा डुकर पाहून त्याच्या पाठी मागें एकलाच लागला असतां डुकर पर्वताचे गुहेंत शिरला मग राजपुत्र बहुत श्रमून पाणी पिण्याकारितां घोड्याखालीं उतरला इतक्यांत एक वाघ येत होता त्यास पाहून भयानें झाडावर चढला. त्याच झाडावर एक अस्वल वाघाच्या भयास्तव पूर्वींच बसला होता. त्याची ह्याची एकदृष्टि होतांच राजपुत्र घाबरा झाला. तेव्हां आस्वल ह्मणाला तूं भिऊं नको. मी तुझा घात करणार नाहीं. तें ऐकूनतो विश्वासानें त्या जवळ बसला आणि वाघही त्या दोघांस पाहून वृक्षा खालीं उभाराहिला मग रात्रीचे ठायीं विजय पाळास झोंप येऊं लागली तेव्हां अस्वल बोलला तूं कांहीं संशय न धरितां माझे मांडीवर नीज. तें ऐकून त्याचे मांडीवर डोकें ठेवून राजपुत्र निजला. तेव्हां वाघ आस्वलास ह्मणाला तूं आणि मी नित्य अरण्यांत राहणारे आणि हा मनुष्य आपला शत्रू यास्तव यास खालीं लोटून दे, ह्मणजे दोघांचेंही कार्य होईल. आस्वलानें उत्तर केलें कीं, तूं कितीही सांगितलेंस तरी मी विश्वासघात करणार नाहीं. तेव्हां वाघ उगाच बसला. मग मध्य रात्र झाल्यावर विजयपाळ उठला आणि त्याची मांडी उशास घेऊन आस्वल निजला. ते समयीं वाघ राजपुत्रा-

स ह्मणतो. तूं या आस्वलाचा विश्वास धरूं नको. कीं; राजनीतींत सांगितलें आहे. श्लोकः—

नखीनांचनदीनांचशृंगिणांशस्त्रधारिणाम् ॥
विश्वासोनैवकर्त्तव्यःस्त्रीषुराजकुलेष्वपि॥२॥

अर्थ.—नदी; तिखट नखाचीं जनावरें, तसेच शिंगांचे पशु, हत्यारी, स्त्रिया आणि राजे, यांचा विश्वास धरूं नये. अशी नीति आहे ह्मणून तुला सांगतों कीं, तूं या आस्वलास खालीं ढकलून दे. ह्मणजे मी यास खाऊन तुला वाट देईन. तें ऐकून राजपुत्रानें त्यास खालीं लोटिलें. तेव्हां तो पडतां पडतां सावध होऊन एके खांदीस धरून पुनः आपले ठिकाणीं आला. तें पाहून राजपुत्र भयानें थरथरां कांपूं लागला. त्यास आस्वल ह्मणतो माझें भय मानूं नको. मी तुझे शरीरास उपद्रव करणार नाहीं. परंतु माझ्या शापानें तुला ससेमिरा या अक्षरांचें वेड लागेल. जेव्हां हीं अक्षरें आधीं आहेत. ज्यांस असे चार श्लोक माझ्या मनांत आहेत ते तुला कोणीं ऐकविणारा भेटेल तेव्हां तुझें वेड जाईल. मग सूर्योदय होतांच वाघ आणि आस्वल आपापल्या ठिकाणीं गेले. विजयपाळ विश्वासघाताच्या पातकामुळें ससेमिरा हीं अक्षरें ह्मणत वेडा होऊन रानांत फिरूं लागला. त्याचा घोडा एकलाच नगरांत आला. तो पाहून नंदराजा चिंतायुक्त होऊन पुत्राच्या शोधार्थ सैन्य घेऊन वनांत गेला. तों विजयपाळ ससेमिरा ह्मणत फिरत आहे असा पाहिला. त्यास घरीं आणून उपाय बहुत केले; परंतु त्याचें वेड जाईना. तेव्हां नंदराजा बहुश्रुत प्रधानास ह्मणतो कीं, जर आज शारदानंद असता तर यास बरें करिता. प्रधान बोलला कीं, आपल्या शहरांत दौंडी पिटवून लोकांस कळवावें ह्मणजे कोणी तरी यास बरें करणारा भेटेल. तें ऐकून

नंदराजानें तसें करावयास आज्ञा केली. नंतर बहुश्रुत प्रधान आपल्या घरीं येऊन शारदानंदास तें वर्तमान सांगता झाला. तेव्हां तो ह्मणाला तूं राजाजवळ जाऊन सांग कीं, माझी कन्या बहुत चतुर आहे ती कांहीं उपाय करील. तें ऐकून प्रधानानें तसेंच राजास सांगून पुत्रासहित त्यास आपल्या घरास आणिलें. नंतर कन्या पडद्यांत बसवितों असें बोलून शारदानंदास पडद्याचे आंत बसवून बाहेर राजपुत्रादिकांसहवर्तमान बसविलें ते समयीं शारदानंद अंतर्ज्ञानानें अरण्यांतील सर्व वर्तमान जाणून हे चार श्लोक पढता झाला:—

सद्भावप्रतिपन्नानांवंचनेकाविदग्धता ॥ अं-
कमारुह्यसुप्तानांहंतुःकिन्नामपौरुषं ॥ १ ॥

अर्थ.—ज्याणें आपल्यावर विश्वास ठेविला त्यास ठकविलें तर त्यांत काय चातुर्य? मांडीवर निजला त्याचा जीव घेतला तर त्यांत काय पराक्रम केला? हा श्लोक ऐकतांच राजपुत्रानें एक अक्षर सोडुन दिलें. आणि 'सेमिरा' हें बोलूं लागला. तों शारदानंदानें दुसरा श्लोक ह्मटला:—

सेतुंगत्वासमुद्रस्यगंगासागरसंगमम् ॥ ब्र-
ह्महत्याविमुच्येतमित्रद्रोहीनमुच्यते ॥ १ ॥

अर्थ.—गंगेचा समुद्राशीं जेथें संगम झाला त्या ठिकाणीं अथवा सेतुबंध रामेश्वरीं गेला असतां ब्रह्म हत्या करणारा मुक्त होतो. परंतु मित्रद्रोही पापा पासून कोठेंच मुक्त होत नाहीं हें ऐकतांच विजयपाळ दुसरें अक्षर सोडून 'मिरा; हें ह्मणूं लागला. तेव्हां शारदानं दानें तिसराश्लोक ह्मटला:—

मित्रद्रोहीकृतघ्नश्चतथाविश्वासघातकः ॥ त्र-
यस्तेनरकंयांतियावच्चंद्रदिवाकरौ ॥ ३ ॥

अर्थ.—मित्राचा घात करणारा, उपकार न जाणणारा, विश्वास देऊन घात करणारा हे तिघे जोंवर चंद्रसूर्य आहेत तों पर्यंत नरकीं राहतात हा श्लोक ऐकून राज पुत्रानें तिसरें अक्षर टांकिलें आणि रा ह्मणूं लागला. तेव्हां शारदानंदानें चवथा श्लोक ह्मटलाः—

राद्धांतःसर्वशास्त्राणामयंनकलुषंपरम् ॥ वि-
श्वासघातात्पुण्यंचनपरोपकृतेःपरं ॥ ४ ॥

अर्थ.—सर्व शास्त्रांचा सिद्धांत असा आहे कीं, विश्वास घाता परतें दुसरें थोर पातक नाहीं. परोपकाराहून दुसरें मोठें पुण्य नाहीं. हा श्लोक ऐकून राज पुत्राचें वेड गेलें. आणि तो रानांतील झालेलें सर्व वर्तमान राजास सांगता झाला. ते वेळीं राजा पडद्यांतील कन्येस पुसतो हे मुली, तूं गांवांत राहतेस अरण्यांत कधींही जात नाहींस असें असतां तेथील वर्तमान तुला कसें कळलें तें सांग? तेव्हां शारदानंद बोलिला देव ब्राह्मणांच्या प्रसादें करून माझ्या जिव्हाग्रीं सरस्वती आहे तिच्या योगानें मी सर्व जाणतों. जसें भानुमतीचे मांडीवरील चिन्ह जाणिलें. तें ऐकतांच नंदराजाची खूण पटली. आणि पडदा वर करून पाहिलें तों शारदानंद बसला आहे. त्यास राजानें आणि विजय पाळानें साष्टांग नमस्कार घालून आपले घरीं नेलें. अशी कथा ब्राह्मणानें विक्रमास सांगितली. तेव्हां त्याणें त्या ब्राह्मणास कोट रुपये दिले. याप्रमाणें तुझें औदार्य असेल तर या सिंहासनावर बैस असें विनया पुतळीचें भाषण ऐकून भोजराजा खिन्नहोऊन आपल्या महालांत गेला. पुनःदुसरें दिवशीं सिंहासनाजवळ आला तेव्हां तिसरी पुतळी जयंती बोलली हे भोजराजा

विक्रम होता. एके दिवशीं त्याणें विचार केला कीं, लक्ष्मी अतिचंचळ आहे. इचा भरवंसा नाहीं. तर सत्कर्मानें इचा व्यय करून पुण्य जोडावें असा निश्चय करून यज्ञास आरंभ करिता झाला. नंतर सर्व यज्ञ सामग्री सिद्ध करून सर्वांस बोलवणीं पाठविलीं. आणि एका ब्राह्मणास सांगितलें कीं, तूं जाऊन समुद्रास आमंत्रण कर. तेव्हां तो ब्राह्मण गंधाक्षता घेऊन समुद्राजवळ येऊन उभा राहिला. आणि ह्मणतो हे सागरा, तुला विक्रमराजानें यज्ञाच्या समारंभास बोलाविलें आहे. कृपा करून आलें पाहिजे. तें ऐकून समुद्र प्रत्यक्ष होऊन बोलतो, हे ब्राह्मणा, विक्रमाने प्रीति करून आमंत्रण पाठविलें तेणेंकरून मला बहुत संतोष झाला. परंतु ईश्वरानें मला आज्ञा केली आहे कीं, तूं आपली मर्यादा सोडून जाऊं नको. ह्मणून मला येतां कामास नये. तर मी त्यास हीं चार रत्नें देतों तीं नेऊन दे. यांचे गुण सांगतों ऐक. ह्या पहिल्या रत्नाची पूजा करून प्रार्थना केली असतां जितकें द्रव्य पाहिजे तितकें उत्पन्न होईल. २ ऱ्या पासून जें अन्न पाहिजे तें निघेल. ३ ऱ्या पासून जें सैन्य पाहिजे तें सिद्ध होईल. ४ थ्या पासून ज्या अलंकाराची इच्छा असेल तो प्राप्त होईल. असें सांगून रत्नें ब्राह्मणाजवळ देता झाला. ब्राह्मणानें तीं चार रत्नें घेऊन विक्रमाजवळ जाऊन सर्व वर्तमान सांगितलें तेव्हां विक्रम त्या ब्राह्मणास ह्मणाला तूं समुद्राजवळ जाऊन थोर कार्य केलेंस तर तुला जें रत्न पाहिजे तें एक यांतून घे. ब्राह्मण ह्मणाला आपल्या घरीं जाऊन सर्वांस विचारीन, नंतर जें घेणें असेल तें घेईन. राजानें तीं चारी रत्नें त्याच्या स्वाधीन केलीं. मग तो ब्राह्मण आपल्या घरीं येऊन सर्वांस तें वर्तमान सांगता झाला. तेव्हां त्याची स्त्री ह्मणाली अन्न प्राप्तीचें रत्न घ्यावें. ह्मणजे सायास न करितां अन्नें मिळतील. पुत्र ह्मणाला सैन्य उत्पन्न होईल तें घ्यावें कन्या बोलली द्रव्यें करून सर्व अनुकूळ होतें. आपल्या

जवळ द्रव्यनाहीं ह्मणून बहूत श्रम करावे लागतात यासाठीं द्रव्य प्राप्तीचें रत्न घ्यावें. सून ह्मणाली माझ्या आंगावर कांहीं वस्ता नाहींत ह्मणून मला माझ्या बहिणी फार हिणावितात तर ज्यापासून अलंकार उत्पन्न होतात तें घ्यावें. अशा सर्वांच्या इच्छा निरनिराळ्या होऊन चौघेंही कलह करूंलागलीं. तें पाहून ब्राह्मणानें चारीरत्नें विक्रमास परत देऊन सांगितलें कीं, राजा माझेंघरीं चार मनुष्यें आहेत त्या चौघांचीं बोलणीं चारप्रकारचीं पडतात यास्तव मला एकही रत्न नको. ते ऐकून विक्रम त्या ब्राह्मणास तीं चारही रत्नें देऊन संतुष्ट करिताझाला. अशी कथासांगून अपराजिता ह्मणाली हे भोजराजा या प्रमाणें तुझें औदार्य असेल तर या सिंहासनावर बैस. तेव्हां भोजराजा लज्जायमान होऊन आपल्या रंगमाहालांत गेला. पुनः दुसरे दिवशीं प्रातःकाळीं सिंहासनावर बसूंलागला तों पांचवी पुतळी जयघोषा बोलली हे भोजराजा, विक्रमा सारिखा उपकार जाणता तूं आहेस तर या सिंहासनावर बैस. राजानें विचारिलें विक्रम उपकार जाणता कसा होता ते सांग मग जय० सांगते.

## कथा ५ वी.

अंवती नगरांत देवदत्त नामा एक ब्रह्माण अग्निहोत्री रहात असे तो समिधा आणावयाकरितां अरण्यांत गेला होता ते दिवशीं विक्रमराजा त्याच अरण्यांत शिकारीस जाऊन एकटाच एक्या डुकरामागें लागला होता. तेव्हां डुकर पळून गेला. आणि राजा वाट चुकून इकडे तिकडे फिरूं लागला तें देवदत्त ब्राह्मणानें पाहून राजास अपल्या आश्रमांत आणिलें, आणि फळें, उदक देऊन नगरास पोंचविलें. तेव्हां विक्रमानें ब्राह्मणास बहुत द्रव्य देऊन सांगितलें हे ब्राह्मणा हा तुझा उपकार माझ्यानें फिटणारनाहीं मीतुझा ऋणी आहें. ब्राह्मण संतुष्ट होऊन आपले घरास गेला त्या दिवसापसून ताब्राह्मण राजाचें घरीं येतजातअसे- एकेदिवशीं ब्रा-

ह्मण मनांत ह्मणतो कीं, राजा जें बोलला होता तें खरें किंवा खोटें याची प्रचीती पहावी. ह्मणून त्याणें राजपुत्र लहान होता त्यास खेळावयाच्या निमित्तें आपणाकडे घेऊन कोणास नकळतां आपले घरीं नेऊन ठेविला. तेव्हां राज पुत्रास कोणीं नेलें हें न समजून विक्रमादिक सर्व दुःखी झाले. आणि त्याचाशोध करूं लागले तों त्या ब्राह्मणानें पुत्रावरचा एक अलंकार काढून सेवकाचे हातीं विकावयास दिला. तो राज सेवकांनी पाहिला, आणि त्यास विचारिलें कीं; ही वस्तु तूं कोठून आणिलीस? तेव्हां तो ह्मणाला. देवदत्त ब्राह्मणानें मजजवळ विकावयास दिली. तें ऐकून राज सेवकांनीं देवदत्तास राजसभेस आणिलें. तेसमयीं विक्रमानें त्यास पुसलें. हीं वस्तु तुला कोठें सांपडली? ब्राह्मण बोलिला हे महाराज, तुझा पुत्रमी लोभास्तव मारिला. हीवस्तु त्याचे अंगावरील आहे तें ऐकून सर्वलोक बोलूं लागले कीं, या दुष्ट ब्राह्मणास बहुत शासन करावें. विक्रम ह्मणाला हे देवदत्ता तूं माझा पुत्र मारिलास तथापि मीं तुला शीक्षा करावी हें योग्य नव्हे. कां मी तुझा अगोदरच उपकारी आहें या प्रमाणें भाषण करूनें पुत्राचा किमपि खेद न करितां त्या ब्राह्मणास विक्रम बहुत द्रव्य देता झाला. असा विक्रमाचा आचार पाहून देवदत्त संतुष्टझाला. आणि पुत्रास आणून राजाच्या स्वाधीन करिता झाला ही कथा सांगून जयघोषा पुतळी ह्मणाली हे भोज राजा असा तूं उपकार जाणता असलास तर या सिंहासनावर पायदे.. तें श्रवण करून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं प्रधानादिक बरोबर घेऊन सिंहासना जवळ आला तेव्हां साहावी पुतळी लीलावती बोलली हे भोजराजा; विक्रमा सारिखा तूं गुणजाणत असशील तर या सिंहासनावर बैस. राजानें विचारिलें विक्रमामध्यें गुणज्ञता कशी होती तें सांग. मग लीलावती सांगते.

## कथा ६ वी.

विक्रम राजा राज्यकरीत असतां एका जोहाऱ्याने एक उत्तम रत्न आणून राजास दाखविलें कीं, ज्याच्या प्रकाशें करून पाहाणाराचे डोळे दिपत असत राजानें रत्नपारखी बोलाविले त्यांणी त्या रत्नाची किंमत कोठं रुपये केली. ते थोडे वाटून विक्रमानें तेसमयीं अठराकोटी रुपये त्या जवाहिऱ्यास देऊन आज्ञा केली कीं, अशींच आणखा दाहा रत्नें घेऊन एकमहिन्याचे आंत ये. ती राजाज्ञा मान्य करून तो जवाहिरी देशांतरी गेला तेथून त्या प्रमाणें दाहा रत्नें घेऊन येत असतां वाटेत मोठा पर्जन्य पडून एका नदीस उतार होत नाहीं. असें पाहिलें. तव्हा जवळचे गांवांत गेला तेथें एक रामदास सावकार होता त्याला आपले वर्तमान सांगितलें. रामदास ह्मणाला मला जर यांतलीं पांच रत्नें देशील तर मी वाहनें देऊन तुला अवंतीस नेऊन घालीन. तें ऐकून जोहाऱ्यानें विचार केला कीं, यास जर रत्नें नदिलीं तर एकमहिन्याचे आंत यावें अशी राजाज्ञा आहे तीमोडेल आणि राजास क्रोध येईल कीं. राज्याचें फळ हेंच कीं, आज्ञा व्यर्थ होऊं नये. ह्मटलें आहेः—

आज्ञामात्रफलंराज्यंब्रह्मचर्यफलंतपः ॥
परिज्ञानफलाविद्यादत्तभुक्तफलंधनं ॥१॥

अर्थ.—राजाची आज्ञा सर्वांनीं मान्य करावी. हेंच राजाचें फळ. ब्रह्मचर्य असावें हेंच तपाचें फळ. विद्याभ्यासाचें फळ हेंच कीं, ज्ञान व्हावें. धनाचें फळ हेंच कीं; भोग आणि दान करणें. ह्मणून राजाज्ञा न मोडेल तें करून मग झालेला व्यवहार विक्रमास कळवावा. असा निश्चय करून पांचरत्नें त्या सावकारास देऊन त्याच्या नावेंत बसला, आणि अवंती नगरास जाता झाला. नंतर विक्रमापुढें पांच रत्नें ठेऊन तो जोहारी उभा राहू-

ला तेव्हां राजानें त्यास पुसलें कीं दुसरीं पांच रत्नें कोठें आहेत? तेव्हां त्याणें हात जोडून राजास सर्व वर्तमान सांगितलें. आणि बोलला महाराज आपपली आज्ञा पालन व्हावी ह्मणून मीं असें केलें आणि तीस दिवसांचे आंत आलों. तें ऐकून विक्रमानें विचार केला कीं, हा मोठा प्रामाणिक आणि बुद्धिमान होय. जो राजाज्ञा न पाळील त्यास मोठा दोष घडतो. हें खरेंच आहे.

आज्ञाभंगोनरेंद्राणांविप्राणांमानखंडनम् ॥
पृथक्शय्याचनारीणामशस्त्रविहितोवधः ॥ १ ॥

अर्थ.—राजाची आज्ञा मोडणें, ब्राह्मणाचा मान भंगकरणें. कारणावांचून स्त्रीस निराळी निजविणें हीं तिन्हीं त्यांच्या वधासमान होतात. असें जाणून त्याणें पांच रत्नें सावकारास दिलीं. असा त्याचा गुण घेऊन विक्रम राजानें त्या जोहाऱ्यास तीं आणलेलीं पांच रत्नें बक्षीस केलीं. ही कथा सांगून लीलावती पुतळी ह्मणाली हे भोजराजा, विक्रमासारिखे गुण तुजमध्यें नसतां व्यर्थ तूं या सिंहासनाची आशा कां धरितोस? तें ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनःदुसरें दिवशीं सिंहासनाजवळ आला. तों मंजुघोषा सातवी पुतळी बोलली दुसऱ्याची इच्छा तृप्तकरणें हा गुण विक्रमा सारिखा तुजमध्यें असेल तर या सिंहासनावर बैस. तेव्हां त्याणें विचारिलें तो गुण त्यांत कसा होता तें सांग. मग मंजुघोषा सांगते.

## कथा ७ वी.

विक्रमराजा एके दिवशीं वसंतऋतूमध्यें चंपक वनांत गेला. तें वन असें पाहिलें कीं, रम्य पुष्करिणी अनेक प्रकारच्या कमळें करून युक्त; हंस. मयूर कोकिला यांहीं करून सुशोभित, नानाप्रकारचे वृक्ष. वेली, आणि जाई, जुई, चमेली, मोगरी, इत्यादिकांनीं वेष्टित असें पाहून तेथें

एक रमणीय बंगला बांधून त्यांत बहुत कारंजीं करवून स्त्रियांबरोबर जलक्रीडा करूंलागला त्या वनांत एक तपस्वी तप करीत होता. त्याणें तो राजाच्या विलास पाहून आपल्या मनांत विचार केला कीं, ह्या लोकींचें सुख सोडून स्वर्गलोकींच्या सुखाची इच्छा करणें यांत काय विशेष? येथें अनेक प्रकारचे कष्ट भोगून मेल्यानंतर त्या लोकींचे भोग भोगावे यापेक्षां येथेंच विषय सुख भोगावें हें फार बरें दिसतें. असें मनांत आणून तो तपस्वी विक्रमाजवळ गेला. राजानें त्याचा सत्कार करून पुसलें कीं, आपली इच्छा काय आहे? तो बोलला हे राजा मी देवीजवळ तप करीत असतां देवीनें दृष्टांत दिला कीं, तप पुरेकर, तुझ्या तपानें मी प्रसन्न जाहल्यें. तूं विक्रमा जवळ जाऊन संसार सुखाचा अनुभव माग. असा दृष्टांत झाला तो तुला सांगितला. संसार सुख भोगावया विषयीं देवीची आज्ञा आणि माझीही इच्छा आहे. असें त्या तपस्व्याचें भाषण ऐकून विक्रम आपल्या मनांत ह्मणाला याला देवी दृष्टांत देवो अथवा न देवो. परंतु यास माझी क्रीडा पाहून येथें आपण क्रीडा करावी अशी इच्छा झाली आहे ती आपण पुरवावी. मग विक्रमानें तेथें मोठें नगर वसवून त्या नगराचा राज्याभिषेक त्या तपस्व्यास केला आणि त्याचे उपजीविकेकरितां दुसरे बारागांव त्यास दिले तेणेंकरून तो तपस्वी संसार सुखातें अनुभविता झाला. ही कथा श्रवण करून भोजराजा अंतःपुरांत गेला. पुनः प्रातःकालीं सिंहासनाजवळ येऊन उभा राहिला, तों जयसेना आठवी पुतळी बोलली हे भोजराजा विक्रमासारिखें ज्याचें साहसकर्म असेल त्याणेंच ह्या सिंहासनावर बसावें. तेव्हां राजानें विचारिलें त्याचें साहस कर्म कसें होतें तें सांग? मग जयसेना सांगते. भोजराजा एक.

## कथा ८ वी.

अवंती नगरांत विक्रमराजा राज्य करीत असतां धनशेट नामा एक

सावकार अनेक व्यापार करून बहुत द्रव्य मिळविता झाला. कोणेएके दिवशीं धनशेटाच्या शरीरीं समाधान नाहींसें झालें तेसमयीं त्याणें विचार केला कीं, ह्या मृत्युलोकची वस्ती फार अशाश्वत आहे हें समजू शाहाण्यानें परलोकचें साधन करावें. तें सांडून मूर्खजन पाप कर्में करितात. आणि कोट्यावधी रुपये असले तरी आणखी इच्छितात. त्यां चांगलें इहलोक सुखही प्राप्त होत नाहीं आणि पार लौकिक सुखाचाही लाभनाहीं तर आतां सर्व व्यवहार टाकून आपण दान धर्मादि पुण्य करावें हेंच बरें. असा निश्चय करून तो सावकार कर्म विपाकादिक शास्त्र प्रमाणें सकल दानें करून तीर्थयात्रेस गेला. तेथें बहुत धर्म करून माघारा येत असतां त्याणें समुद्राचे कांठीं एक देवालय पाहिलें. त्यां जाऊन देवीचें दर्शन घेतलें. तों तिचे डावे बाजूस स्त्री पुरुषांचीं धडें व मस्तकें निराळीं होऊन पडलीं होतीं, तींही पाहिलीं. आणि उजवे बाजूस एका चिन्यावर लिहिलेलें होतें कीं, जो पुरुष अचाट करणीचा असेल त्याणें आपल्या हातानें आपलें शिर देवीचे पुढें तोडावें. म्हणजे हीं स्त्री पुरुषें जीवंत होतील. तें पाहून सावकार विस्मित होऊन अवंती नगरीस आला. आणि देवीचा प्रसाद व कांहीं जवाहीर घेऊन विक्रमाच्या भेटीस गेला ह्मटलें आहे.—

रिक्तपाणिर्नपश्येत्तुराजानंदेवतांगुरुम् ॥
दैवज्ञंभिषजंमित्रंफलेनफलमादिशेत् ॥

अर्थ.—कांहीं भेट नेल्या वांचून रिकाम्या हातीं राजा गुरु, देव, ज्योतिषी, वैद्य. आणि मित्र यांचें दर्शन घेऊं नये. आपल्या शक्ती प्रमाणे फलादिक जें अनुकूल असेल तें पुढें ठेवून काय बोलणें तें बोलावें. त्या सावकारानें भेट पुढें ठेविली. ते समयीं विक्रमानें त्यास विचारिलें कीं

कोठें कांहीं विशेष चमत्कार पाहिला असला वर सांगावा. तें ऐकून ध-
नशेटीनें देवी जवळ पाहिलेला चमत्कार सांगितला. तेव्हां राजास फार
आश्चर्य वाटलें. आणि त्या सावकारास बरोबर घेऊन त्या ठिकाणीं गे-
ला. तों तेथें धनशेटानें सांगितल्या प्रमाणेंच आहे तें पाहून विक्रमाचें
हृदय त्या स्त्री पुरुषांविषयीं अत्यंत कळवळलें आणि परोप कारा करितां
तो आपलें शरीर तोडूं लागला. तेव्हां देवी प्रत्यक्ष त्याचा हात धरून बोल-
ली हे विक्रमा, तूं दुसऱ्या साठीं आपला प्राण कां देतोस? राजानें उत्त-
र केलेंकीं, हे जगदंबे, सर्वांचें कल्याण असावें आणि सर्वांनीं सुखी व्हा-
वें असें माझ्या मनांत आहे परंतु तें माझ्या स्वाधीन नाहीं. ह्मणून मी
आपले प्राण अर्पण करितों कीं जेणें करून हीं स्त्री पुरुषें उठून सुख पा-
वतील. तें ऐकून देवीनें तीं स्त्री पुरुषें जीवंत केलीं. मग विक्रम तेथील
राज्य त्यांस देऊन आपण अवंतीस येता झाला. ही कथा ऐकून भोज
राजा खिन्न होऊन माघारा गेला. पुनः प्रातःकाळीं सिंहासनाची पायरी
चढूं लागला तों मदनसेना नववी पुतळी बोलली हे भोज राजा, विक्र-
मा सारिखें तुझें धैर्य असेल तर तूं या सिंहासनावर बैस. तें ऐकून त्याणें
विचारिलें विक्रमाचें धैर्य कसें होतें तें सांग? मग मदनसेना सांगते राजा ऐक.

## कथा ९ वी.

विक्रमराजा राज्य करीत असतां त्याचे जासूद कोठें काय आहे हें
पाहावया करितां सर्व देशांत फिरत असत. हें राजास योग्य होय ह्म-
टलें आहे; श्लोकः—

गावःपश्यंतिगंधेनवेदैःपश्यंतिवाडवाः ॥
चारैःपश्यंतिराजानश्चक्षुर्भ्यामितरेजनाः ॥ १ ॥

अर्थ.—वासानें पशु जाणतात, वेदानें ब्राह्मण पाहतात, दूतद्वारा राजे

जाणतात. आणि इतर लोक प्रत्यक्ष नेत्रानेंच पाहून समजतात. असा तो राजा राज्य करीत असतां एके दिवशीं काश्मीर देशाहून जासूद आला त्याणें वर्तमान सांगितलें कीं, काश्मीर देशांत निर्जलपुर नामें एक नगर आहे त्यांत पाण्याचा मोठा दुष्काळ होता. ह्मणून हरिदास सावकारानें लाखो रुपये खर्च करून मोठें एक तळें बांधिलें. तेणेंकरून सर्व नगरास उदक पुष्कळ झालें. आणि तळ्यास पाट बांधिले. त्या पाण्यानें जीं शेतें पिकूं लागलीं तीं ब्राह्मणांस दान दिलीं. कोणे एकेदिवशीं असें झालें कीं, त्या तळ्यांत एक देवी येऊन राहिली तिणें त्यांतील सर्व उदक शोषून तळें कोरडें पाडिलें आणि सावकारास दृष्टांत दिला कीं, मी येथें येऊन राहिलें असतां मला तूं बळी दिला नाहींस ह्मणून मी हें कृत्य केलें. आतां जर तूं मला बत्तीस लक्षणी पुरुषाचा बळी देशील तर मी संतुष्ट होऊन तळ्यांत सर्वदा अपार पाणी करीन. असें स्वप्न पाहून सावकारानें एक लक्ष रुपयांचा सुवर्णाचा पुतळा करून तळ्यांत ठेविला. आणि त्याच्याजवळ एक खांब पुरून त्याजवर लिहिलें आहे कीं, जो बत्तीस लक्षणी पुरुष असेल त्याणें आपलें रक्त या तळ्यांतील देवीस देऊन तळ्यास पाणी लावावें आणि हा सुवर्णाचा पुतळा घ्यावा. जासूद ह्मणतो महाराज असें वर्तमान मी आपल्या दृष्टीनें पाहून आलों. तें ऐकून विक्रम, जासुदास घेऊन त्या तळ्याजवळ गेला. तेथें त्याणें सांगिल्याप्रमाणें पाहून त्या नगरांत एका ब्राह्मणाचे घरीं उतरला. नंतर त्या ब्राह्मणास ह्मणाला तूं हरिदासाकडे जाऊन त्यास विचार कीं, ह्या तळ्यास पाणी लाविलें तर सोन्याचा पुतळा देऊन आणखी काय देशील तें स्वहस्तें लिहून दे. ब्राह्मणानें सावकारास तसें पुसलें तेव्हां त्याणें संतोषानें लिहून दिलें कीं, दुसरें पंनास हजार रुपये देईन. तें पत्र घेऊन ब्राह्मण आला. रात्रौ विक्रमराजा हातांत ढाल

अपूर्वेयंधनुर्विद्याभवताशिक्षिताकुतः॥ मा-
र्गणौघःसमभ्येतिगुणोयातिदिगंतरं ॥ १ ॥

अर्थ.–हे विक्रमा; ही अपूर्व धनुर्विद्या तूं कोणाजवळ शिकलास? ज्या विद्येनें बाण तुजकडे येतात. आणि धनुष्याची दोरी बाहेर जाते या प्रकारें श्लोकाचा अर्थ दिसण्यांत, येतो; परंतु वास्तविक अर्थ असा हो तोकीं, तूं मागणारास बहुत द्रव्य देतोस ही कीर्ति दिगंतरीं जावे ह्मणून याचक तुजकडे येतात असा अर्थ समजून पूर्वदिशेचें राज्य यास द्यावें असें मनांत आणून विक्रम दक्षिणेकडे तोंड करून बसला. मग कवीनें दुसरा श्लोक ह्मटला:–

सर्वदासर्वदोसीतिमिथ्यात्वंकथ्यसेबुधैः ॥
नारयोलेभिरेपृष्ठंनवक्षःपरयोषितः ॥ २ ॥

अर्थ.–हे राजा; तूं सर्वदां सर्व देतोस अशी लटकीच तुझी स्तुती लोक करितात. ती लटकी कशी ती ऐक. तूं शत्रूस पाठ आणि परस्त्रियांस हृदय हीं कधींही दिलीं नाहींस. हा श्लोक ऐकून त्या कवीस दक्षिण दिशेचें राज्य द्यावें असें मनांत आणून विक्रम पश्चिमेस बसला. नंत त्यानें तिसरा श्लोक ह्मटला:–

अरयस्तेभयत्रस्ताःस्फुटिताघटवद्धृदि ॥ ग-
लितंनेत्रपाताच्चराजंश्चित्रमिदंमहत् ॥ ३ ॥

अर्थ.–हे विक्रमा, तुझ्या भयानें तुझे शत्रु त्रास पावून त्यांचे हृदय घट फुटलें. त्यांतून उदक गळावें तें नेत्रांतून गळूं लागलें. हा मोठा चमत्कार आहे तें ऐकून राजा उत्तरेस बसला. तों कवीनें चवथा श्लोक ह्मटला–

सरस्वतीस्थिताकंठेलक्ष्मीःकरसरोरुहे ॥ रा-
जेंद्रकुपिताकीर्तिस्तेनदेशांतरंगता ॥ ४ ॥

अर्थ.– हे विक्रमा तुझ्या कंठाचेठायीं सरस्वती आणि हस्ताचेठायीं लक्ष्मी राहिली ह्मणून रागानें किर्ती देशांतरी गेली. असें श्रवण करून विक्रमानें कवीस नमस्कार करून सांगितलें कीं, तुला चारी दिशांचें राज्य दिल्हें तेव्हां कवीनें उत्तर केलें कीं, मी राज्य घेऊन काय करूं तें तुला अक्षय असो. तुझे दातृत्वानें मी फार संतुष्ट झालों, नंतर राजास आशीर्वाद देऊन कवी आपल्या ठिकाणास जाता झाला. या प्रमाणें विक्रम दाता परोपकारी, शूर असा लौकेक स्वर्गीं कळून इंद्रानें त्यास सिंहासन पाठवून दिलें. मग त्याजवर बसून बहूत दिवस राज्य करून शेवटीं तो स्त्रीसहित स्वर्गवासी झाला. ते समयीं आकाश वाणी झालीकी, या सिंहा सनावर बसावयास आतां कोणी योग्य नाहीं यास्तव हें भूमीत पुरून ठेवा. मग प्रधानांनीं तसें केलें. तें हें सिंहासन आज तुला सहज सांपडलें. आणि तूं याजवर बसावयास सिद्ध झाला आहेस परतु विक्रमाची योग्यता तुझे अंगी नाहीं ह्मणून तूं याजवर बसूंनयेस या प्रमाणें जया पुतळीचें बोलणें ऐकून भोजराजा खिन्न होऊन आपल्या महालांत गेला. आणि मनांत विचार करितो कीं, ही एक पुतळी बोलली याजवरून दुसऱ्याही बोलतील असें वाटतें; तर आपण कौतुकानें नित्य सिंहासनावर बसावयाकरितां जात असावें. असें मनांत आणून पुनः दुसरे दिवशीं सिंहासना जवळ आला. तेव्हां विजया नामें दुसरी पुतळी बोलूं लागली, हे भोजराजा विक्रमासारिखें औदार्य तुझें असेल तर या सिंहासना वर चढ. तें ऐकून भोजराजा विचारितो त्याचें औदार्य कसें तें सांग मग विजया सांगतें.

तलवार घेऊन एकटाच तळ्यांत गेला. आणि जळदेवतेची स्तुति क-
करून ह्मणाला हे देवी मी बत्तीस लक्षणी पुरुष तुला आपलें सर्व शरीर
अर्पण करितों हें घेऊन लौकर जळानें तळें पूर्ण करावें असें बोलून ख-
ड्गानें आपलें शरीर तोडूं लागला. तेव्हां देवी राजाचें धैर्य पाहून प्रसन्न
झाली आणि त्याचा हात धरून बोलली हे विक्रमा, कांहीं वर माग, तो
ह्मणाला हें तळें सर्वदा उदकानें भरलेलें असावें येवढेंच मागतों. तें दे-
वीनें मान्य करितांच तळें पूर्ण भरलें, नंतर विक्रमराजा त्या ब्राह्मणास
सुवर्णाचा पुतळा आणि पन्नास सहस्र रुपये देऊन आपण अवंतीस येता
झाला. ही कथा सांगून मदनसेना ह्मणाली भोजराजा, असें विक्रमाचें
परोपकार करण्याविषयीं धैर्य ऐकून अद्यापि त्याच्या सिंहासनावर बसा-
वयाची इच्छा धरितोस तस्मात् तुजसारिखा अविचारी पुरुष दुसरा को-
णीच नाहीं. असें ऐकून भोजराजा अतःपुरांत जाता झाला. पुनः दुसरे दिव-
शीं सिंहासनाजवळ गेला. तों मदनमंजरी दाहावी पुतळी बोलली हे भो-
जराजा, विक्रमासारिखा तुझा पराक्रम असेल तर या सिंहासनावर बैस.
त्याणें पुसलें विक्रमाचा पराक्रम कसा होता मग मदनमंजरी सांगतेः—

## कथा १० वी.

विक्रमराजाचा उपाध्याय शंकरशर्मा होता. त्याचा पुत्र कमलाकर नामा
होता. तो सोळा वर्षांचा झाला. तथापि कांहीं विद्याभ्यास करीना,
ह्मणून त्याचा पिता ह्मणाला. अरे कमलाकरा, तूं मोठा झालास अद्यापि
विद्याभ्यास करीत नाहींस, हें फार वाईट करितोस कां? विद्येवांचून
पुरुषाचें जिणें व्यर्थ आहे. ह्मटलें आहे; श्लोः—

**विद्याविधिविहीनेनकिंकुलीनेनदेहिनां ॥**
**अकुलीनोपिविद्वान्योदेवतैरपिपूज्यते ॥ १ ॥**

अर्थ.— विद्यारहित जो पुरुष तो मोठ्या कुलांतला असला तथापि त्यास कोणी पुसत नाहीं नीच कुलांत झालेला असून जर विद्वान आहे तर त्याची पूजा देवही करितात. असा पित्याचा उपदेश ऐकून कमलाकरानें विचार केला कीं, पित्यानें जी गोष्ट सांगितली ती खरी आहे. विक्रमराजा पंडितांस बहुत धन देऊन सन्मान करितो आणि मूर्खांशीं भाषणही करीत नाहीं. तस्मात् विद्येवांचून आपली प्रतिष्ठा होणार नाहीं. तर आतां देशांतरीं जाऊन विद्याभ्यास करावा हें बरें. मग तो काश्मीर देशास गेला. तेथें विमलभट्ट उपाध्याय महा थोर विद्वान् होता. त्याच्या घरीं जाऊन त्यास साष्टांग नमस्कार करून सर्व वर्तमान सांगता झाला. तेव्हां उपाध्यायानें त्यास जवळ ठेवून घेतला असतां त्याणें उपाध्यायाची सेवा केली. तणेंकरून तो प्रसन्न होऊन त्यास सर्व विद्या सांगता झाला. ह्मटलें आहे:—

गुरुशुश्रूषयाविद्यापुष्कलेनधनेनवा ॥
अथवाविद्ययाविद्याचतुर्थंनोपलपभ्यते ॥ १ ॥

अर्थ.— गुरूची सेवा करून अथवा पुष्कळ द्रव्य देऊन किंवा आपली विद्या सांगून दुसऱ्याची विद्या घ्यावी या तीन उपायांवांचून चौथ्या प्रकारानें विद्या प्राप्त होत नाहीं. नंतर तो कमलाकर बहुत विद्या शिकला आणि गुरूची आज्ञा घेऊन आपल्या गांवास येत असतां वाटेंत कांतीपुरीस राहिला. तेथें नरमोहिनी नामें एक कलावंतीण फार सुंदर होती तिला पाहून त्यास कामविकार झाला. तेव्हां तेथील लोकांनीं सांगितलें कीं, हिच्या घरीं जो पुरुष जातो त्यांस राक्षस मारितो. तें ऐकून तो खिन्न होऊन अवंतीस आला आणि राजाचें दर्शन घेतलें. राजानें विचारिलें कीं, देशांतरीं कांहीं नवल पाहिलें असेल तर सांगावें. तेव्हां

कमलाकरानें नरमोहिनीचें वर्तमान सांगितलें. विक्रमानें मनांत विचार केला कीं, या ब्राह्मणाचें मन तिजकडे लागलें आहे. ह्मटलें आहे श्लोक.

बेधाद्वेधाभ्रमंचक्रेकांतासुकनकेषुच ॥

तासुतेष्वप्यनासक्तःसाक्षाद्भर्गोनराकृतिः ॥ १ ॥

अर्थ.— ब्रह्मदेवानें मोह करणारे पदार्थ दोन उत्पन्न केले. एक स्त्री. दुसरें धन. यांस पाहून जो मनुष्य भुलत नाहीं तो केवळ महादेव जाणावा. मग विक्रमराजा त्या वेश्येचे गांवांस गेला. आणि रात्रौ राक्षस मारून तीस सुखी केलें. दुसरे दिवशीं तिला कमलाकरासमोर उभी केली. तिचीं सर्व भूषणें काढविलीं डोईचे केस मोकळे सोडविले. तेव्हां तेंच तिचें सौंदर्य फार उणें दिसूं लागलें. मग राजा भटजीस ह्मणतो, ब्राह्मणा अशीला पाहून काय ह्मणून तूं भुललास अरे, हे स्तन मासाचे गोळे आहेत. हें तिचें तोंड थुंकी, लाळ याणीं भरलेलें असें आहे. अशा दुर्गंध पदार्थांचा अंगीकार करणें तो संतती करितांच करावा असा राजानें विषयाचा उपहास केला तेणेंकरून भटजीच्या मनांतील कामविकार शांत झाला नंतर राजानें एक सुंदर स्त्री मिळवून भटजीचें लग्न करून दिलें. ही कथा सांगून मदनमंजरी ह्मणते हे भोजराजा असा पराक्रम तुजमध्यें असेल तर या सिंहासनावर बैस. हें ऐकून तो माघारा गेला. दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ गेला तों शृंगारकलिका नामें अकरावी पुतळी बोलिली हे भोजराजा, विक्रमासारिखें ज्याचें दयालुत्व असेल त्याणेंच यावर बसावें. इतरास अधिकार नाहीं. त्याणें विचारिलें कीं, विक्रमाचें तें कसें होतें तें सांग तेव्हां शृंगारकलिका सांगतेः—

## कथा ११ वी.

विक्रमराजा राज्य करीत असतां कोणी एक योगी नर्मदेच्या कांठीं

योगाभ्यास करीत असे. त्यास राजानें पालखी पाठवून बोलाविलें तेव्हां त्याणें उत्तर केलें कीं, मी विषयाची आशा सोडिली आतां राजाजवळ यावयाचें मला काय कारण आहे? ह्मटलें आहे.

आशायायेदासास्तेदासाःसर्वलोकस्य ॥
आशायेषांदासीतेषांदासायतेविश्वं ॥ १ ॥

अर्थ.— जे आशेचे स्वाधीन झाले ते सर्व लोकांचे दास होतात आणि आशा ज्याचे स्वाधीन झाली त्याचे लोक दास होवात आणि आशा धरिल्यानें पापेंही घडतात. ह्मटलें आहेः-

लोभमूलानिपापानिव्याधयोरसमूलकाः ॥
स्नेहमूलानिदुःखानित्रयंत्यक्तासुखीभवेत् ॥ १ ॥

अर्थ.— पापाचें मूळ लोभ, रोगाचें मूळ आवडेल तें खाणें, दुःखांचें मूळ स्नेह होय. तस्मात् हीं तीन ज्याणें सोडिलीं तो सुखी होतो. असा त्याचा निरोप ऐकून विक्रमराजा त्याच्या दर्शनास गेला. आणि त्याची सेवा बहुत दिवस करिता झाला. एके दिवशीं योग्यानें संतुष्ट होऊन योग बलानें एक फळ उत्पन्न केलें. आणि हें भक्षिलें असतां मरण येई तोंपर्यंत शरीरास रोग होणार नाहीं. असा त्याचा गुण सांगून फळ विक्रमास दिलें. तें घेऊन राजा अवंतीस येत असतां वाटेंत एक रोगी रक्तपितीनें हात पाय झडून पडला होता. त्यास पाहून विक्रमास कळवळा आला आणि विचार करिता झाला कीं, याचें दुःख पाहून आपण सुखाची इच्छा करणें हें योग्य नव्हे. नंतर त्याणें तें फळ रोग्यास दिलें आणि आपण अवंतीस येता झाला. अशी कथा ऐकून भोजराजा सिंहासनापासून परतला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ गेलाः तों नरमोहिनी नामें बारावी पुतळी बोलली हे भोजराजा, विक्रमासारिखे परोपकार

तुझ्यानें होतील तर या सिंहासनावर बैस. त्याणें विंचारिलें कीं. विक्रमानें कोणावर उपकार केला तें सांग ! मग नरमोहिनी सांगते. राजा ऐक.

## कथा १२ वी.

विक्रमराज्यानें नियम केला होता कीं, साहा महिने राज्य कारभार करून प्रजेचे संरक्षण करावें आणि साहा महिने प्रधानावर कारभार सोंपवून आपण अनेक देशाटन करावें. तेथें जे कोणी गरीब दुबळे आढळतील त्यांस दुःखा पासून सोडवावें. असा काळ वांटिला होता. तेणें करून सर्व जन सुखी असत. आणि राजाही निश्चित पणाचें सुख भोगीत असे. झटलें आहें.

मात्रासमंनास्तिशरीरपोषणंभार्यासमंनास्तिशरीरतोषणं ॥
विद्यासमंनास्तिशरीरभूषणंचिंतासमंनास्तिशरीरशोषणं ॥

अर्थ.—आई सारखें शरीराचें रक्षण करणारें दुसरें नाहीं. स्त्री सारखें शरीरास सुख देणारें आणखी नाहीं. विद्ये सारीखें शरीरास अन्य भूषण नाहीं. चिंते सारिखें शरीरास क्षीण करणारें दुसरें नाहीं.

अर्थातुराणांनपितानबंधुःकामातुराणांनभयंनलज्जा ॥
क्षुधातुराणांनबलंनतेजश्चिंतातुराणांनसुखंननिद्रा ॥

अर्थ.—द्रव्याची इच्छा ज्यांस फार आहे ते बाप आणि भाऊबंद यांची भीड राखीत नाहींत जे स्त्रीच्या व्यसनीं लागले त्यांस भय आणि लाज वाटत नाहीं. जे भुकेनें व्याकुळ त्यांस तेज आणि बल नसतें. ज्यांस चिंता आहे त्यांस कोठेंही सुख होत नाहीं, आणि निद्रा येत नाहीं. एके समयीं राजा ज्योतिर्लिंगाचे दर्शनास जात असतां वाटेंत रात्रीं एका वृक्षा खालीं वस्तीस राहिला त्या वृक्षावर अनेक देशींचे पक्षी बसून नाना

प्रकारच्या गोष्टी बोलत होते त्या ऐकूं लागला. राजास पक्ष्यांची बोली समजत असे. त्यांतील एक पक्षी दुसऱ्यास सांगतो. अहो सेवाळ देशांत उमरबेट नामें नगर आहे तेथें एका राक्षसानें बहुत मनुष्यें भक्षिलीं. तेव्हां सर्वांनीं त्याची प्रार्थना केली कीं, हे समर्था, तूं अशीं माणसें मारशील तर कांहीं दिवसानीं सर्व नाहींशीं होतील. मग तुझा चरितार्थ चालणार नाहीं. तर आह्मीं तुला नित्यानें एक एक मनुष्य देत जाऊं, तें खाऊन तूं स्वस्थ राहावें. यांत तुझें आणि आमचें बरें आहे. तें राक्षसानें मान्य केलें नंतर त्या नगर कऱ्यांनीं दर घरास पाळी लाविली ती पाळी उद्यां एका फकीरावर आली आहे. तो फकीर बहुत पक्ष्यांस पोषित असतो त्यास राक्षसानें मारिल्यावर तेथें आह्मांस दाणा पाणी मिळण्याचें कठीण आहे. असें त्यांचें भाषण ऐकून सर्व पक्षी श्रमी होऊं लागले. त्यांचें दुःख पाहून विक्रमराजा त्याक्षणीं दिव्य पादुका पायीं घालून त्या नगरास गेला. आणि त्या फकीरास ह्मणाला. तूं बहुत जीवांचें पालन करितोस आणि माझ्यानें कांहींच होत नाहीं. ह्मणून मी आपल्या जीवास कंटाळलों आहें. तर तुझ्या जागीं मी राक्षसापाशीं जातों. तें ऐकून तो ह्मणाला बाबा तुझी इच्छा. मी तुला जा ह्मणून सांगणार नाहीं. मग विक्रम त्या राक्षसाचे जेवावयाचे शिळेवर जाऊन बसला. विक्रमास पाहतांच राक्षसाची दुष्टबुद्धि गेली. आणि त्यास पुसतो तूं कोण आहेस? राजानें उत्तर केलें, तूं आपलें कामकर. माझी चौकशी कशास करितोस? राक्षस बोलला नाहीं नाहीं. तुला पाहतांच माझी दुष्टबुद्धि गेली. तुझें धैर्य पाहून मी प्रसन्न झालों. काय पाहिजेतें माग. विक्रम ह्मणाला तूं आज पासून मनुष्यें खाऊं नको. तें मान्य करून तो राक्षस द्वीपांतरीं गेला. आणि विक्रमराजा अवंतीस आला. अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला. तो भोगनिधी

तेरावी पुतळी बोलिली. हे भोजराजा तुझें धैर्य विक्रमासारिखें असेल तर या सिंहासनावर बैस. भोजराजानें विचारिलें विक्रमाचें धैर्य कसें होतें तें सांग? मग भोगनिधी सांगते.

## कथा १३.

विक्रमराजा राज्य करीत असतां अवंतीचे ठायीं कोणीं एक भद्रसेन नामा सावकार मरण पावला. तेव्हां त्याचा पुत्र पुरंदर नामक विचार करिता झाला कीं, सर्व हें नाशिवंत आहे. जी बापाची अवस्था झाली तीच माझी होणार असा विचार करून तो प्रपंचावर निस्पृह होऊन घरच्या सर्व संपत्ती ब्राह्मण, ब्राह्मणी, दीन; अंध इत्यादिकांस देता झाला. ह्मटलें आहे:—

उदारस्यतृणंवित्तंशूरस्यमरणंतृणम् ॥
विरक्तस्यतृणंभार्यानिस्पृहस्यतृणंजगत् ॥१॥

अर्थ.— उदार पुरुषास द्रव्य तृणवत्. शूरास मरण, विरक्तास स्त्री, निस्पृहास सर्व जग तृणाचेपरी तुच्छ वाटतें. याप्रकारें तो विरक्त होऊन तीर्थयात्रा करावयास जाता झाला. कोणे एके रात्रीस भद्रेश्वर नामक देवाचे देवळांत राहिला होता. तेथें रानांत कोणीं मोठ्यानें रडूं लागलें. तें ऐकून त्याणें तेथील राहणारांस पुसलें कीं, हें कोण रडतें? लोक ह्मणाले आह्मीही नित्य असेंच ऐकतों. परंतु आमच्यानें रात्रीं अरण्यांत जाऊन शोध करवत नाहीं. जो मोठा धैर्यवान् असेल तोच याचा शोध करील. पुरंदर यात्रा करून अवंतीस आला तेव्हां त्याणें ती गोष्ट विक्रमास सांगितली. ती ऐकून राजा त्यास बरोबर घेऊन त्या देवळांत गेला. तेथें रात्रीस रडणें ऐकून त्याच्या सुमारानें अरण्यांत गेला. तों मोठा एक राक्षस एका स्त्रीस मारितो आणि तो रडते आहे असें पाहून

राजा त्यास ह्मणतो अरे दुष्टा ही गरीब स्त्री इला तूं कां व्यर्थ मारितोस? तुजमध्यें सामर्थ्य आहे तर ये मजपाशीं लढ! पाहूं तुझा पराक्रम! असें ऐकतांच तो राक्षस चालून आला. तेव्हां विक्रमानें युद्ध करून त्यास मारिलें. आणि त्या स्त्रीस विचारिलें तूं कोण? तुला हा कां छळीत होता? ती सांगते, मी ब्राह्मणी आहें. आपल्या पतीस बहुत गांजीत होतें ह्मणून रागानें त्याणें प्राण दिला. आणि राक्षस होऊन नित्य मला मारीत होता. त्या दुःखापासून आज मला सोडविलेंस. मी तुझी फार उपकारी झाल्यें. तर पतीचें द्रव्य बहुत आहे तें सर्व तुला मी देतें. असें बोलून मोहरांचे सात हांडे राक्षसानें रानांत पुरून ठेविले होते ते दाखविले. विक्रमराजा दुसरे दिवशीं तें सर्व द्रव्य गरीबगुरीबांस देऊन आपण अवंतीस येता झाला. अशी कथा ऐकून भोजराजा माघारा जाता झाला. दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला तों रतिप्रिया चौदावी पुतळी बोलली हे भोजराजा. विक्रमासारिखा दाता असेल तोच या सिंहासनावर बसेल. इतरांस अधिकार नाहीं. तें ऐकून त्याणें विचारिलें विक्रमाचें दातृत्व कसें होतें सांग. मग रतिप्रिया सांगते राजा ऐक.

## कथा १४.

विक्रमराजा देशाटन करीत असतां कृष्णातीरीं गेला. तेथें पुराण कथन चाललें होतें तें ऐकत बसला होता. त्या समयीं पुराणिकानें हा श्लोक वाचिला.

परोपकारायफलंतिवृक्षाःपरोपकारायवहंतिनद्यः ॥
परोपकारायदुहंतिगावःपरोपकारार्थमिदंशरीरम् ॥१॥

अर्थ.— परोपकारासाठीं वृक्ष फळतात परोपकारासाठीं नद्यां वाहतात. गायी परोपकारासाठीं दूध देतात आणि हें शरीर परोपकारासाठींच ई-

श्वरानें दिलें आहे. इतक्यांत एक ब्राह्मण पलीकडून स्त्रीस घेऊन येत होता तो कृष्णेंत बुडूं लागला तेव्हां त्याणें पुराणास लोक बसले होते त्यांस बहुत हांका मारिल्या. परंतु त्यास काढावयास कोणी गेला नाहीं. तव्हां विक्रमानें नदींत उडी घातली. आणि त्यास बाहेर काढिलें. मग तो ब्राह्मण राजास ह्मणतो. मी आज स्त्री सहित प्राणास मुकत होतों तो तुझ्यायोगानें वांचलों. तर मी जें आज बारा वर्षें तप केलें आहे त्याचें पुण्य तुला दिलें. असें ह्मणून तो राजाच्या हातीं उदक घालता झाला. नंतर विक्रम अवंतीस येत असतां वाटेंत विक्राळ स्वरूप एक ब्रह्म राक्षस उभा राहिला आणि ह्मणाला हे महा पुरुषा मी या ब्रह्म राक्षस योनीत दुःख पावतों. माझा उद्धार कर तें ऐकून राजानें ब्राह्मणानें दिलेलें पुण्य त्या ब्रह्मराक्षसास दिलें तेणें करून तो पापापासून मुक्त होऊन स्वर्गास गेला आणि विक्रम अवंतीस येता झाला. अशी कथा ऐकुन भोज राजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ गेला तेव्हां सुमित्रा नामें पंधरावी पुतळी बोलली हे भोजराजा विक्रमासारिखा तुझा ईश्वरा वर भर वसा असेल तर या सिंहासनावर बैस. त्याणें विचारिलें विक्रमाचें तें कसे होतें मगसुमित्रा सांगते. राजा ऐक.

## कथा १५

विक्रमराजा तीर्थ यात्रा करित असतां कोणे एके समयीं आंवढ्या नाग नाथास गेला. तेथें देवळांत एक योगी होता त्याणें त्यास ओळखिलें. आणि विचारिलें हे विक्रमा, तुं राज्य टांकून असा कां फिरतोस! विक्रम बोलतो आपणा सारिख्या साधुंचे दर्शन घ्यावयास फिरत असतों. योगी ह्मणतो तिकडे कोणी शत्रु आल्यास तुझें राज्य कोण रक्षील! जरि प्रधानादिक असले तरी धन्यावांचून त्यांस तेज असत नाहीं. विक्रम ह्मणतो

य
टा
आले

ही चिंता मी कशास करूं; ज्याणें मला राज्य दिलें त्यास त्याची काळजी आहे याविषयीं मी एक कथा सांगतों, ऐकावी.

पूर्वी जयखंड नगरींत, शंकर नामा राजा राज्य करित होता. एकेसमयीं दायादांनीं त्याचें राज्य कपटानें घेऊन त्यास गांवा बाहेर लांवून दिलें मग तो स्त्रीसहित देशोदेशीं फिरत असतां भद्रावती नगराजवळ रात्रौ एके वडाखालीं निजला. त्या वडावर पांच यक्ष रहात होते ते आपआपल्यांत बोलूं लागले. ह्या नगरींचा राजा मरण पावला आहे. त्यास पुत्र नाहीं आतां हें राज्य कोणास द्यावें त्यांतील एक बोलला हीं स्त्रीपुरुषें फार संकटांत आहेत यांसच देऊं या. तें सर्वांनी मान्य केलें. तें ऐकून राजा दुसरे दिवशीं स्त्रीला घेऊन त्या नगरांत गेला. तों तेथें प्रधानादिकांनीं हतीण ज्याला माळ घालील तो राजा करावा. असा निश्चय करून सोंडेंत माळ देऊन हत्तीण सोडली होती तेव्हां यक्षानीं आपल्या सामर्थ्यानें हत्तीणी करवीं शंकर राजाचे गळ्यांत माळ घालविली. मग प्रधानानी त्यास राज्याभिषेक केला. असा तो राजा राज्य करित असतां त्याजवर शत्रू चढून आला. ते समयी जय शंकर राजाचीस्त्री ह्मणाली. हे महाराज. परचक्रानें सर्व नगरास वेढा घातला. अद्यापि आपण कांहीं उद्योग करित नाहीं याचें कारण काय! त्यानें उत्तर केलें. ज्यानी मला राज्य दिलें तेच यक्ष रक्षण करतील. मी कशास काळजी करूं. असें बोलुन जयशंकर राजा स्वस्थ बसला. मग यक्ष आपल्या मनांत ह्मणतातकीं, यानें आमच्या वर विश्वास ठेविला आहे तर आह्मांस याचें राज्य रक्षण करणें प्राप्त आहे. नंतर यक्षांनीं आकाशांतून पाषाण वृष्टी करून परचक्राचा पराभव केला. तें कौतुक पाहून राणी बोलली हें कर्म यक्षांवांचून दुसऱ्याचें नव्हे. बरें एवढे उपकार यक्ष आह्मांवर कां बरें करितात असें बोलत असतां तेथें यक्ष येऊन ह्मणाले आह्मी पूर्वजन्मीं कांहीं एक दो-

षास्तव मत्स्य होऊन लहानशा तळ्यांत पाण्यावांचून घाबरे होऊं लाग-
लों तेव्हां हा तुझा पति कुंमार होता यार्णे आह्मांस मोठ्या सरोवरांत ने-
ऊन सोडिलें तो उपकार स्मरून आह्मीं यास राज्यदिलें आणि संरक्षण-
ही केलें. असें त्याचें भाषण ऐकून राजानें त्यांस नमस्कार केला. नंतर
तें आपल्या स्थानास गेलें. ही कथा ऐकून योग्यानें प्रसन्न होऊन विक्र-
मास चिंतामणि रत्न दिलें तें घेऊन तो उज्जनीस येत असतां वाटेंत एक
ब्राह्मण येऊन ह्मणाला मी दरिद्रानें बहुत त्रासलों माझें दरिद्र दूर करा-
वयास तूं समर्थ आहेस तें ऐकून विक्रम त्यास चिंतामणि देऊन आपल्या
नगरास गेल.. ही कथा श्रवण करून भोजराजा माघारा गेला. पुनः दुस-
रे दिवशीं सिंहासना जवळ आला तों प्रेमावती सोळावी पुतळी बोलली
हे भोजराजा, विक्रमा सारिखें ज्याचें सामर्थ्य असेल तोच याजवर बसेल.
भोजराजा पुसूं लागला विक्रमाचें सामर्थ्य कसें होतें तें सांग मग प्रे-
मावती सांगते.

## कथा १६.

विक्रमाचा एक मित्र सुमती नामा होता. तो काशीयात्रा करून अवं-
तीस येत असतां वाटेंत एका देवालयांत उतरला. तेथें एक कढई ते-
लानें भरून तिच्या खालीं जाळ लाविला होता. आणि लग्नाचें सर्व सा-
हित्य करून ठेविलें होतें. तें पाहून सुमतीनें लोकांस विचारिलें कीं, ये-
थें काय आहे? त्यार्णीं सांगितलें या गावांत मदन मंजरी राज कन्या ब-
हुत सुंदर आहे तिणें नियम केला आहे कीं, जो या कढईंत उडी टां-
कून जिवंत निघेल त्याची मी स्त्री होईन. आणि सर्व राज्य त्यास देईन,
या साठीं बहुत राज पुत्र आले आहेत. किती एक या कढईंत उडी
टाकून मेले. असें लोक सांगताहेत. तों मदन मंजरी देवीच्या दर्शनास
आली. तिला पाहतांच सुमति बहूत मोहित होऊन मनांत ह्मणतो आ-

हा, कायहें सौंदर्य! अशी सुंदर स्त्री ज्यास मिळेल तो धन्य!! तोच पुण्यवान्, व्यर्थ माझा जन्म. असा तो तिच्या चिंतनें फार शुष्क होऊन अवंतीस आला. विक्रमाची भेट झाली तेव्हां त्याणें विचारिलें सख्यातूं शुष्क कां झालास? त्याणें मदन मंजरीचें वर्तमान सांगितलें तें ऐकून विक्रम मनांत ह्मणतो, हा माझा मित्र, याचें दुःख दूर करावें. हें मला योग्य होय, संकट काळीं कामास न पडे तो मित्र कशाचा? नंतर तो सुमतीस ह्मणतो, सख्या मदन मंजरीच्या गांवास जाऊं चल तें ऐकून सुमतीस बहुत आनंद झाला. मग दोघे जण योग पादुकांवर बसून त्या देवळांत गेले; तेथें सुमतीनें सांगितल्या प्रमाणें पाहून राजा कढई जवळ गेला. इतक्यांत मदन मंजरी तेथें आली. आणि विक्रमास पाहून आपल्या मनांत खिन्न होऊन ह्मणते हाय हाय! असा दिव्य पुरुष मज करितां आला आणि आतां माझी दुष्ट प्रतिज्ञा पाहून तो माघारा जाईल. मग ती राजास ह्मणाली हे महा पुरुषा, मी मना सारिखा पति मिळावा ह्मणून अशी प्रतीज्ञा केली होती ती आतां राहो. मी तुला वरत्यें. विक्रम बोलला, हें ठीक नव्हे जर कां मी कढईंत उडी न घालतां तुझा पति झालों तर यांत दोघाचीही अपकीर्ती होईल. आणि सर्व लोक हसूं लागतील. ह्मणून तुझी प्रतिज्ञा मी शेवटास नेतों. नंतर मी तुला सांगेन तसें कर. असें तिशीं बोलून विक्रमानें वेताळाचें स्मरण करून त्या कढईंत उडी टाकिली. ते समयीं वेताळानें अमृत शिंपून राजास बाहेर काढिलें. तो बाहेर येतांच पाहिल्या पेक्षां अधिक सुंदर दिसूं लागला. तेव्हां मदन मंजरी त्यास नमस्कार करून बोलली राजा, तुझा जयजयकार असो. तुझ्या सारिखे अवतारी पुरुषांच्या आधारानेंच ही पृथ्वी राहिली आहे. ह्मटलें आहे.—

येदीनेषुदयालवःस्पृशतियानल्पोपिनश्रीमदोव्य-
ग्रायेचपरोपकारकरणेहृष्यंतियेयाचिताः ॥ स्व-
स्थाःसंतिचयौवनोन्मदमहाव्याधिप्रकोपेऽपियेतैः
स्तंभैरिवसुस्थिरैःकिलभरक्रांताधराधार्यते ॥ १ ॥

अर्थ.—जे. पुरुष दीनाचे ठायीं दयाळू ज्यांस संपत्तीनें गर्व होत नाहीं जे परोपकार करण्या विषयीं सर्वांचे पुढें. कोणीं कांहीं मागितलें असतां ज्यांस हर्ष होतो आणि तारुण्याचे भरामध्यें असतां उन्मत्त होऊन ज्यांचें चित्त चंचल होत नाहीं ते पुरुष मला वाटतें कीं, या पृथ्वीचे टेंके होत अशी मदन मंजरीनें विक्रमाची स्तुति केल्यानंतर विक्रम तीस ह्मणाला तूं माझे मित्राची स्त्री हो. ती बोलली मी तुझीच स्त्री होईन दुसऱ्यास पति करणार नाहीं. विक्रम ह्मणाला तूं सांगशील तें मी ऐकेन असें तू अगोदरच मान्य केलेंस ह्मणुन मीं हे एवढें साहस कर्म केलें तर आतां तुला माझें ह्मटलेलें करणें प्राप्त आहे तें ऐकून मदन मंजरी निरुपाय झाली आणि तिणें सुमतीस वरिलें. मग विक्रमराजा सुमतीस तें राज्य देऊन आपण अवंतीस आला. हो कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं आला असतां सुप्रभा नांवाची सतरावी पुतळी ह्मणाली राजा विक्रमा सारिखें दान तुझ्यानें होईल तरच या सिंहासनावर बैस. त्याणें विचारिले विक्रमानें दान कोणास केलें तेव्हां सुप्रभा सांगते. राजा ऐक.

## कथा १७ वी.

राजा विक्रम कोणे एके दिवशीं शिकारीस गेला होता तो मोठा एक डुकर पाहून त्याचे पाठीस लागला असतां डुकर पर्वताचे गुहेंत शिरला तों तेथें पाताळांत जाण्याचा मार्ग होता तो पाहून त्याणें विचारकेला

की, या विवरांत उतरलों असतां कोठें जावों तें पाहूंयां मग तो बिराच्या खांद्यावर बसून त्या मार्गानें गेला. तो पाताळांत पावला. तेथें बळीचें द्वाराजवळ शंख, चक्र, गदा, पद्म, अशीं चार आयुधें हातांत घेऊन विष्णुउभा होता त्यास पाहिलें आणि साष्टांग नमस्कार घातला. तेव्हां विष्णूनें विक्रमास आलिंगन देऊन बळीचे घरांत गेला. बळीनें त्यास आपले जवळ बसवून विचारिलें तूं येथें कोणीकडे आला आहेस विक्रम ह्मणाला आपलें व श्रीविष्णूचें दर्शन व्हावें ह्मणून आलों. ती इच्छा माझी परिपूर्ण झाली. मग उभयतानीं नाना प्रकारच्या गोष्टी केल्या, नंतर बळीने विक्रमराजास सांगितलें माझ्या राज्यांतील तुला जी वस्तु पाहिजे ती माग मी देईन तें ऐकून विक्रम ह्मणाला माहाराज आपलें दर्शन झालें यांत माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले दुसरें मला कांहीं नको. बळी ह्मणतो विक्रमा तूं संकोच धरितोस तुला माझ्या मैत्रीची आठवण राहावी. असें माझ्या मनापासून आहे. या साठीं तुला आवडेल तें मी द्यावयास सिद्ध आहें ह्मटलें आ०

ददातिप्रतिगृण्हातिगुह्यमाख्यातिपृच्छाति ॥
भुंक्तेभोजयतेचैवषड्विधंप्रीतिलक्षणम् ॥ १ ॥

अर्थ.—आपली वस्तु मित्रास देतो, मित्रानें जी दिली ती घेतो. आपली गुज गोष्ट मित्रास सांगतो, मित्राची आपण पुसतो, मित्राचे घरीं जेवावयास जातो आणि त्यास आपल्या घरीं जेवावयास बोलावितो. हे साहा प्रकार प्रीतीचे आहेत. या प्रमाणें बळी बोलला असतां विक्रम उगाच राहिला. नंतर बळीनें सर्पाच्या मस्तकावरचा एक अमोलिक मणि विक्रमास दिला तो घेऊन विक्रम गेलेले मार्गानें माघारा भूतलीवर आला आणि अवंतीस येत असतां वाटेंत एका ब्राह्मणानें त्याची प्रार्थना केली.

राजा मी फारदरिद्री आहें माझें दारिद्र दूरकर. तें ऐकून राजास दया आली. आणि तो दिव्य मणिजवळ होता तो देऊन त्या ब्राह्मणास संतुष्ट केलें अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं आणखीं विक्रमाची कीर्तिश्रवण करावया करितां सिंहासना जवळ आला. तों कुरंग नयना अठरावी पुतळी बोलली राजा विक्रमा सारिखा परोपकार तुझ्याने होईल तर या सिंहासनावर बैस. त्याचा परोपकार कसा होता तो मी सांगत्यें ऐक.

## कथा १८ वी.

कोणीं एका ब्राह्मणानें चंद्रसेन राजा जवळ विक्रमाची बहुत स्तुति केली. ती ऐकून त्याणें मनांत आणिलें कीं, विक्रम आपला शत्रु होय तर त्या पेक्षां आपली कीर्ति अधिक होईल तें करावें. असा निश्चय करून चंद्रसेनानें देवी जवळ तपश्चर्या केली. तेव्हां देवीनें प्रसन्न होऊन वर दिला कीं, तूं आपल्या शरीराची आहुती दे ह्मणजे मी तुझ्या भारंभार सोनें तुला देत जाईन, त्या वरून तो राजा नित्य बहुत वेळ अग्नींत उडी टाकीत होता. आणि वराप्रमाणें देवी त्यास जीवंत करून त्याचें भारंभार सुवर्ण देत होती. तितकेही सोनें तो विक्रमाच्या ईर्षेस्तव ब्राह्मणांस देत असे, हें वर्तमान विक्रमास कळलें तेव्हां त्याणें विचार केला कीं, चंद्रसेन राजा माझ्या ईर्षे करितां एवढें दुःख भोगितो तर आपण त्याचें दुःख दूर करावें. असा निश्चय करून तो त्या देवीजवळ गेला आणि तिची प्रार्थना करून ह्मणतो हे जगदंबे, तूं सर्वांचें दुःख दूर करितेस अशी तुझी कीर्ति लोकामध्यें गाजते आहे तर आतां माझ्या देहाची एकदांच आहुति घेऊन चंद्रसेनास अक्षय लक्ष्मी द्यावी. त्यास वारंवार अग्नींत पडावयाचा श्रम देऊं नये. अशी प्रार्थना करून विक्रमानें अग्निकुंडांत उडी टांकिली तेव्हां देवी प्रसन्न झाली.

आणि त्यास जिवंत करून ह्मणत्ये हे राजा, तुजसारिखा परोपकार कर्त्ता दुसरा कोणी होणार नाहीं. दुसऱ्याचें दुःख दूर करावया साठीं आपल्या प्राणावर उदार होणें हें फार कठीण आहे. त्यांतही चंद्रसेन तुझा द्वेष करीत असतां तूं त्यास दुःख नव्हावें ह्मणून आपला प्राण दिलास त-स्मात् तुझी बरोबरी करणारा कोण आहे? राजा, तर आतां तुझी प्रार्थना मीं मान्य केली. असें. बोलून देवी गुप्त झाली. विक्रम राजाही अवंतीस गेला. अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला तेव्हां एकुणिसावी पुतळी चंद्रज्योति बोलते. हे भोजराजा विक्रमासारिखें दुर्घट कर्म तुझ्यानें होईल तरया सिंहासनावर बैस. तें ऐकून भोजराजा विचारितो, त्याणें कोणतें दुर्घट कर्म केलें. तें सांग? मग चंद्रज्योति सांगते.

## कथा १९ वी.

राजा विक्रम राज्य करीत असतां कोणी एक ब्राह्मण विंध्य पर्वता वरून येऊन राजास भेटला. राजानें त्यास विचारिलें आपण कांहीं चम-त्कार पाहिला असेल तर सांगावा. ब्राह्मण बोलला राजा मी जो चमत्कार पाहिला आहे तो सांगितला असतां तुला खोटा वाटेल.ह्मणून मी सांगा-वयास आशंकतो. असें ऐकून राजानें बहुत. आग्रह केला. तेव्हां तो ब्राह्मण सांगूं लागला. राजा ऐक मी पृथ्वीस प्रदक्षिणा करावयास नि-घालों तों विंध्या चलावर पावलों. तेथें एक तळें पाहिलें त्या तळ्यांत एक खांब आहे त्यावर एक रत्नजडित सिंहासन आहे. तो खांब सूर्य उगवला ह्मणजे दिसूं लागतो. मग जसजसा सूर्य चढतो तस तसा तो खांब उंच वाढत जातो. तेथील लोक असें सांगतात कीं, मध्यान्हीं सूर्य त्या खांबा वरच्या सिंहासनाजवळ बसून अमृत प्राशन करीत असतो नंतर जस जसा सूर्य उतरतो तस तसा तो खांब पाण्यांत बुडतो सूर्य मा-

वळतांच खांब दिसेनासा होतो त्या तळ्यांत जो स्नान करितो त्याची सर्व पापें जातात हें ब्राह्मणाचें भाषण ऐकून विक्रमास बहुत आश्चर्य वाटलें. मग आपण योग पादुका पायांत घालून त्या तळ्या जवळ गेला. तेथें दिवस उगवतांची ब्राह्मणानें सांगितल्या प्रमाणें खांब दिसूं लागला. त्यास नमस्कार करून विक्रम त्याजवर जाऊन बसला. तोंडानें सूर्य मंत्राचा जप करितो आहे. मग जस जसा खांब उंच जाऊं लागला तस तसा विक्रमास अधिक दाहा होऊं लागला. तों प्रहर दिवस येतां येतां प्राण कासावील होऊन मरण पावला नंतर दोन प्रहरीं सूर्यत्या सिंहासनावर बसून अमृत प्राशन करीत असतां त्याणें अमृत शिंपून विक्रमास जिवंत केलें. ते समयीं विक्रमानें स्तुति करून सूर्यास प्रसन्न केलें. तो वरमाग ह्मणाला. तेव्हां विक्रमानें प्रार्थना केली, हे देवा तुझें दर्शन होणें दुर्घट आहे तें होऊन तुजशीं भाषण झालें,आणखी आतां काय मागूं? तें ऐकून सूर्यानें आपले कानांतील कुंडलें काढून विक्रमास दिलीं आणि सांगितलें कीं, या कुंडलांपासून नित्य एकभार सोनें उत्पन्न होईल. असें बोलून सूर्य आकाशीं गेला. सायंकाळीं विक्रम पृथ्वी तळीं येऊन अवंतीस जात असतां वाटेंत एक कुटुंब वत्सल ब्राह्मण अत्यंत दरिद्री पाहिला. तेव्हां त्यास तीं सूर्यानें दिलेलीं कुंडलें अर्पण केलीं आणि आपण अवंतीस आला. ही कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला तों चंद्रकांती विसावी पुतळी बोलली हे राजा, विक्रमासारिखें साहस कर्म तुझ्यानें होईल तर या सिंहासनावर बैस. तें ऐकून त्याणें विचारिलें कीं, विक्रमानें कोणतें साहस कर्म केलें तेव्हां चंद्रकांती सांगते राजा ऐकः—

## कथा २० वी.

कोणी एक माधव नामा ब्राह्मण बहुत चतुर गाणारा स्वरूप वान अ-

सा होता. त्याणें ज्या राजा जवळ जावें त्या राजाच्या मनांत यावें कीं, हा मदना सारिखा सुंदर आणि गुणवान् आहे यास पाहून आपल्या स्त्रिया मोहीत होतील याज करितां याला आपल्या राज्या बाहेर घालवून द्यावा. असें बहुत ठिकाणीं झालें ह्मणून तो माधव पश्चात्ताप पावून तीर्थ यात्रा करीत असतां फिरत फिरत देवनगरीस आला. तेथें कामसेन राजाचे घरीं काम कंदला नामें कलावंतीण नृत्य करीत गात होती, तेथें दरवाज्यांत उभाराहिला आणि तें गायन ऐकून बोलला कीं, गाणारी तर बहुत चतुर आहे; परंतु ऐकणारे सर्व मूर्ख आहेत असें दोन तीन वेळा बोलला. तें सेवकानें राजास सांगितलें. राजा सेवकास ह्मणाला त्यास विचार कीं, तूं सर्वांस मूर्ख ह्मणतोस हें कसें तें सांग. सेवकानें तसें विचारिलें तेव्हां माधव ह्मणाला येथें जो मृदंग वाजवितो त्यास आंगठा नाहीं ह्मणून त्याची थाप चांगली उठत नाहीं इतके या गाण्यांत उणें आहे, तें कोणाचे लक्षांत येत नाहीं सेवकानें तें राजास सांगितलें असतां राजानें चौकशी केली. तेव्हां समजलें कीं, मृदंगी याणें मेणाचा आंगठा लाविला आहे. मग कामसेन राजानें दुसरा मृदंगी आणवून माधवास वस्त्रें भूषणें देऊन सभेंत आणून बसविलें आणि कामकंदलेस सांगितलें कीं, हा ब्राह्मण फार चतुर आहे. तर जितका तुझ्यांत गुण असेल तितका आज यास दाखीव. तें ऐकून तिणें उत्कृष्ट नाच व गायन केलें. तो तिचा गुण पाहुन माधव फार प्रसन्न झाला आणि वाहवा ह्मणून त्याणें राजानें दिलेलें सर्व तिला दिलें. तें राजास न साहून त्याणें सेवकास आज्ञा केली कीं, या क्षणीं ह्यास गांवाबाहेर लाऊन द्या आज्ञा होतांच तितके रात्रीं सेवकांनीं त्यास गांवा बाहेर नेऊन सोडिलें. ते समयीं माधव एका झाडा खालीं बसून विचार करितो.

**मातायदिविषंदद्यात्विक्रीणातिपितासुतं ॥**
**राजाहरतिसर्वस्वंतत्रकापरिदेवना ॥ १ ॥**

अर्थ.—जरकां आईच विष देईल अथवा बापच पुत्रास विकील, किंवा राजाच सर्वस्व हरील तर तेथें कोणाचा उपाय चालणार आहे? असा तो चिंता करीत बसला आहे, तों इकडे कामकंदला नाच करून घरीं आली आणि आपल्या चाकरांस ह्मणाली त्या ब्राह्मणाचा शोध करून या क्षणीं घेऊन या. तें ऐकून तितके रात्रीस सेवकांनीं शोध करून माधवास तिचे घरीं नेला. नंतर ती फार श्रमी होऊन बोलली माधवा. मजकरितां तुझा अपमान झाला. तर आतां जितका वेळ आनंदांत जाईल तितका घालवूं या. प्रातःकाळीं तुजकरितां राजानें जरी माझा प्राण घेतला तरी मला मान्य आहे. असें ह्मणून तिणें गायनास आरंभ केला. तें सुरस गायन ऐकून माधवास वाटलें कीं, ही कोणी स्वर्गींची अप्सरा आली आहे काय? मग तिचें गाणें संपल्यावर माधवानें गाईलें तें ऐकून कामकंदलेचा गर्व जाऊन तिचे अंगावर रोमांच उभे राहिले. आणि डोळयावाटे आनंदाश्रूंच्या धारा चालूं लागल्या. तेव्हां तीस वाटलें कीं. हा कोणी साक्षात् गंधर्वच आहे काय? या प्रमाणें ती उभयतां गायनाचे रंगांत होतीं तंव इतक्यांत पाहांट झाली. तेव्हां माधवास राजाज्ञेचें स्मरण होऊन बोलला कीं, हे कामकंदले, आतां मी जातों. नाहीं तर मजकरितां राजा तुला यातना करील. कामकंदला बोलली माधवा तुझें सारिख्या गायनाचा भोगी सोडून मी या मूर्खा जवळ राहात नाहीं. मी तुझे बरोबर येतें. माधव ह्मणाला ही गोष्ट सध्या अवघड आहे. ईश्वराच्या इच्छेनें जेव्हां घडेल तेव्हां घडो; परंतु आतां तर निघून जातों. मागाहून तुला नेण्याचा यत्न करीन तें ऐकून तीस बहुत दुःख झालें. माधवास

ही गहिंवर आला. मग तो तसाच उठून रडत गांवा बाहेर गेला. नंतर तिच्या योगानें अत्यंत दुःखित असा देशोदेशीं फिरत असतां विक्रमाची कीर्ति ऐकून अवंतीस आला आणि एका देवळांत राहिला. तेथें रात्रीस कामकंदलेचा अतिशय शोक करीत बसला आहे इतक्यांत विक्रमाची स्वारी आली. त्याणें त्यास पाहिलें आणि पुसलें हे ब्राह्मणा, तुला काय दुःख आहे तें सांग? अरे मी विक्रम राजा तुझें दुःख दूर करीन. तें ऐकून माधवानें सर्व वर्तमान सांगितलें. तेव्हां विक्रम ह्मणाला. ब्राह्मणा, आधींच वेश्येशीं प्रीतिकरणें, मग तिचा विरह मानणें हा मोठा वेडेपणा आहे. रे. ती धना करितां पुरुषाला आपली प्रीति दाखवीत असते. माधव बोलला, राजा तूं ह्मणतोस हें खरें आहे; परंतु ती तशीनव्हे तो माझ्या गुणाची जाणती आहे ह्मणून आह्मीं उभयतां एकत्र असल्या वांचून फार दिवस वाचणार नाहीं. तें ऐकून विक्रमानें त्या ब्राह्मणास आपले घरीं आणिलें. आणि सुंदर वेश्या, गायन कलेंत निपुण अशा त्याच्या पुढें उभ्या करून त्यास ह्मणाला या स्त्रियांतून जी तुला पाहिजे ती घे. माधव बोलला राजा कामकंदले सारिखी कामकंदलाच. जर तिचा आणि माझा योग करशील तरच हा देह ठेवीन. तो त्याचा निश्चय पाहून दीन दयाळ राजा त्यास बरोबर घेऊन सर्व सैन्या सुद्धां देव नगरी जवळ आला आणि कामसेन राजास पत्र पाठविलें कीं, मी विक्रमराजा कामकंदले करितां येथें आलों आहें तिला पाठवून दे नाहींतर युद्धास सिद्ध हो. काम सेनानें उत्तर लिहिलें कीं; मी कामकंदलेला देत नाहीं. युद्ध करावयास सिद्ध आहें. तेव्हां विक्रमानें विचार केलाकीं, आधीं कामकंदलेच्या प्रीतीची परीक्षा पाहूं. नंतर युद्ध करूं. मग तो एकटाच तिच्या घराजवळ गेला. आणि मी वैद्य आहें असें बोलला. तें ऐकून दासीनें त्यास माडीवर नेऊन कामकंदलेस दाखविलें. तेव्हां राजा

तिचें नांव विचारून तिची परीक्षा करून बोलला इला विरहाचें दुखणें आहे तें ऐकून कामकंदला बोलली तर याचा उपाय तुजपासीं नाहीं मग उगाच कां श्रम घेतोस? राजानें उत्तर केलें खरेंच गोष्ट गेली, नाहीं तर तुला ज्याचा विरह आहे तो पुरुष तुला आणून दिला असता परंतु थोडेच दिवस झाले माधव तुझें नांव घेतां घेतां मरण पावला. ते शब्द कर्णीं पडतांच ती वेश्या माधवा! माधवा! असें ह्मणून प्राण सोडिती झाली. तें पाहून सर्व मनुष्यें रडूं लागलीं. त्यांस विक्रम बोलिला तुह्मी रडूं नका. इला मूर्च्छा आली आहे. औषध आणून मी आतां सावध करीन. असें सांगून राजा माधवा जवळ आला. आणि त्यास कामकंदलेचें वर्तमान सांगता झाला. तें ऐकतांच कामकंदले! कामकंदले! असें बोलून त्यानें ही प्राण सोडिला. तेव्हां विक्रम पश्चात्ताप पावून ह्मणतो. हाय हाय! दोघांची हत्या मला घडली. आतां हा दोष घेऊन माघारें जाण्या पेक्षां येथेंच मरावें हें बरें. असा निश्चय करून अग्नि पेटवून आंत उडी टाकूं लागला. ते समयीं वेताळ प्रगट होऊन ह्मणाला राजा. प्राण देऊं नको मी एक वस्तु देतों ही त्यांच्या मुखांत घाल ह्मणजे जिवंत होतील. असें बोलून तो विक्रमास अमृत संजीवनी औषधी देता झाला. ती घेऊन विक्रमानें तसें करितांच दोघेंही जिवंत झालीं. नंतर राजानें कामसेनास जिंकिलें आणि कामकंदला माधवाचे स्वाधीन करून त्यास कामसेनाचे राज्यावर स्थापिला आणि आपण अवंतीस गेला अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला. तेव्हां एकविसावी पुतळी सौभाग्य मंजरी बोलली हे भोजराजा, विक्रमा सारिखें खरें खोटें पाहणें तुझ्यानें होईल तर या सिंहासनावर बैस. त्याणें पुसलें कीं, " विक्रमाचें तें कसें होतें तें सांग. तेव्हां सौभाग्य मंजरी सांगते. ऐक.—

# कथा २१ वी.

एके दिवशीं विक्रमानें प्रधानास विचारिलें कीं, मनुष्यास बुद्धि येते ती त्याच्या पूर्व कर्मानें किंवा माता, पिता, गुरु यांच्या शिकविण्यानें येते तें सांग? प्रधानानें उत्तर केलें कीं, हे महाराज, जर दुसऱ्याच्या शिकविण्यानें बुद्धि येत तर मूर्ख कोणीच न होते, सर्व लोक पंडितच होते. कां सर्व मनुष्यांस असें वाटतें कीं, आपल्यास सर्व विद्या याव्या, आणि सुख व्हावें परंतु हें कोणाचे स्वाधीन नाहीं म्हणूनच, कितीएक शहाणे व कितीएक मूर्ख असे होतात राजा बोलला हें जर खरें तर लोक मुलांस विद्या शिकविण्याविषयीं श्रम कां घेतात? प्रधान म्हणाला पूर्व कर्मांचेंच नांव दैव तें प्रत्यक्ष येऊन मनुष्यास शिकवीत नाहीं. उद्योग द्वारां शिकवितें. यासाठीं उद्योग करावा. म्हटलें आहे:—

उद्योगिनंपुरुषसिंहमुपैतिलक्ष्मीर्दैवंप्रधानमिति
कापुरुषावदंति ॥ दैवंविहायकुरुपौरुषमात्म
शक्त्यायत्नेकृतेयदिनसिध्यतिकोत्रदोषः ॥ १ ॥

अर्थ—उद्योग करणारास फल प्राप्ति होते. दैवच मुख्य असें जे कोणी म्हणतात ते शाहाणे नव्हत म्हणून दैवावर भार न घालतां यत्न करावा. मग यत्न करूनही कार्य सिद्धि न झाल्यास आपणाकडे दोष नाहीं. असें दोघाचें बोलणें झाल्या नंतर मंत्री म्हणाला हे महाराज या गोष्टी विषयीं आपणास संशय असेल तर अनुभव घेऊन पाहिल्या नंतर निःसंशय होईल. तें ऐकून विक्रमानें अरण्यांत एक बंगला बांधिला. त्यांत बारावर्षांचें साहित्य ठेवून आपला पुत्र, प्रधानाचा पुत्र, कोतवालाचा पुत्र व ब्राह्मणाचा पुत्र अशीं लहान लहान वयांचीं चार मुलें त्यांत ठेविलीं. त्यांच्या रक्षणाकरितां मुक्या बायका ठेविल्या, आणि बंगल्याभोंवताले रक्षक ठेवून त्या मुलांस

मनुष्यांचा शब्दही ऐकूं येऊं नये. असें केलें त्यास दोन तीन वर्षे गेलीं. तेव्हां एके दिवशीं तेथें एक देवरूपी पुरुष प्रगट झाला. त्याणें सर्व रक्षकांस मोह घालून मुलांस बोलावयास शिकविलें आणि आपण अ- दृश्य झाला. मग बारावर्षे झालीं तेव्हां विक्रमानें मुलांस आणविलें. आणि प्रथम आपल्या पुत्रास विचारूं लागला. हे पुत्रा तूं सुखी आहे- सना? त्याणें उत्तर केलें तुमच्या पुण्यानें सुखी आहें नंतर प्रधानाच्या पुत्रास विचारिलें. तो हात जोडून ह्मणाला आपल्या कृपेनें कुशल आहें. मग ब्राह्मणाच्या मुलास पुसलें तो अशीर्वाद देऊन ह्मणाला राजा, ईश्वरा वांचून कोणी सुखी नाहीं मनुष्यमात्रास कोणती तरी एकादि चिंता असते. शेवटीं कोतवालाच्या पुत्रास पुशिलें. तो प्रणाम करून बोलला हे महाराज. लोक चोरी, चाहाडी, लबाड्या करितात. त्यांस शिक्षा कशी होईल या काळजींत मी आहें अशीं चौघांचीं भाषणें ऐकून विक्रमानें विचारिलें तुह्मांस बोलावयास कोणीं शिकविलें? तें सांगा. ते बोलले, कोणी एक पुरुष आला होता, त्याणें आह्मांस बोलावयास शि- कवून मी देव असें सांगून गुप्त झाला- तें श्रवण करून विक्रम प्रधानास ह्मणाला; तूं बोलला होतास तें खरें झालें. आतां माझी खात्री झाली कीं, मुख्य दैवचकारण होय. शिकविणारादिक सर्वही निमित्त मात्र आहेत. ही कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनःदुसरे दिवशीं सिंहासनाज- वळ आला असतां लावण्यवती बाविसावी पुतळी बोलली हे भोजराजा विक्रमासारिखा पुण्यवान् असेल त्यासच हें सिंहासन प्राप्त होईल. त्याणें विचारिलें विक्रम कसा पुण्य वान् होता तें सांग. मग लावण्यवती सांगते राजा ऐक.

## कथा २२ वी.

विक्रमानें कोणी एक शंखचूड नामक दुष्ट राजा होता त्यास मारून

त्याचें राज्य घेतलें. तेव्हां जुनेकारभारी घरीं बसवून नवे ठेविले आणि आपण तेथें कांहीं दिवस राहिला असतां एके दिवशीं शंख चूडाचा प्रधान नदींत स्नान करीत होता तों वरून एकसुंदर फूल वाहात आलें तें घेऊन तो घरीं आला आणि मनांत ह्मणतो हें फूल बहुत करून इंद्राचे वनांतलें असेल याचे सुगंवास आणि चांगले पणास यालोकीं उपमा नाहीं तर अशी ही अप्रतिम वस्तु विक्रमास दिली असतां तो प्रसन्न होऊन आपणांस कांहीं कामकाज सांगेल असें मनांत आणून तें फूल त्याणें राजास नेऊन दिलें. तें पाहतांच विक्रमास पूर्व जन्मींची आठवण झाली. तेव्हां त्या प्रधानास बोलता ह्या फुलाचा वृक्ष आणून देशील तर मी तुला जें पाहिजे तें देईन. आणि न आणिलास तर तुझें सर्वस्व घेऊन तुला गांवाबाहेर घालवून देईन. तें ऐकून तो प्रधान घरीं आला. आणि चिंता कारतो आहे कीं. ईश्वराने मजवर मोठें संकट आणिलें आहे आतां वृक्ष आणावयास न गेलों तर राजा सर्वस्व हरील. गेलों तर तो सांपडल्यास बरें. न सांपडल्यास देशांतरीं राहावें लागेल. असो. परंतु न जाऊन परिणाम नाहीं. मग तो प्रधान एकें नावेंत बसून त्या नदीचे ओघा समोर चालला. जातां जातां बहुत दूर गेला. तों मोठें एक अरण्य लागलें त्यांतील सिंह, व्याघ्र, आदिकरून पशु नदी तीरीं पाणी पीत होते त्यांस पाहून भयाभीत जाहला. इतक्यांत अकस्मात वरून तसलें एक फूल वाहात आलें तें पाहून थोडासा त्याम भरवसा आला पुढें जातो आहे तों असें दृष्टीस पडलें कीं; त्या नदीचें तीरावरून एक मोठें झाड झळकत आहे त्याचे खांदीवर एक मांसाचा पिंड आहे त्या पासून एकें एक रक्ताचा थेंब उदकांत पडतो त्याचे फूल होऊन उदकांत जातें असें पाहून नावेंतून उतरला आणि तीरीं येऊन पाहूं लागला तों त्या झाडाचे वरले आंगीं दुसरे तसेच पिंड दृष्टीस पडले.

परंतु त्या पिंडापासून रक्ताचे थेंब पडत नव्हते. या प्रमाणें पाहून तो प्रधान पुनः नावेंत बसून आपले नगरास आला, आणि त्याणें तें सर्व वर्तमान विक्रमास सांगितलें. तें ऐकून विक्रम बोलला ज्या पिंडापासून फुलें उत्पन्न होतात तो माझा देह आहे आणि दुसरे पिंड पाहिलेस ते जे माझ्याबरोबर राज्यकारभार करीत आहेत त्यांचे देह होत. पूर्वीं मीं असें उग्रतप केलें ह्मणून. मला राज्य प्राप्त झालें आणि माझ्या बरोबरच्यानींही तसेंच तप केलें ह्मणून ते आज हें वैभव भोगीत आहेत. जो प्राणी जसें कर्म करितो त्या सारिखें त्यास फळ. प्राप्त होतें. याचा प्रत्यय दाखवावया करितां तुला मी तेथें पाठविलें. असें बोलून विक्रमानें त्या प्रधानास मोठें राज्य काम सांगून संतुष्ट केलें. अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला असतां करुणावती तेविसावी पुतळी बोलली. हे भोजराजा, आतां मी विक्रमाची एक गोष्ट सांगतें ती ऐक.

## कथा २३.

एके दिवशीं विक्रम राजा सभेत बसला असतां सुतारानें बहुत सुंदर एक लांकडाचा घोडा आणिला आणि राजास ह्मणाला हे महाराज, हा घोडा घेऊन माझें कसब पहावें. विक्रमानें त्यास विचारिलें कीं. यांत कोणता गुण आहे? सुतार बोलला यावर बसून कळ दाबिली ह्मणजे हा जिकडे पाहिजे तिकडे मनुष्यास अति त्वरेनें नेतो हा या मध्यें गुण आहे. राजा ह्मणाला तर यास फिरवून दाखीव? तेव्हां तो सुतार वर बसून अनेक प्रकारच्या चाली दाखवून शेवटीं त्यास धांववूं लागला. तेव्हां त्याजवर दृष्टीही ठरेनाशी झाली. असा त्याचा गुण पाहून विक्रमानें तो घोडा घेतला, आणि सुतारास एक लाख रुपये दिले तेव्हां तो बहुत संतुष्ट होऊन ह्मणाला राजा; त्या घोड्यास फिरवितेवेळेस टांच लाऊं नये.

जर कां ती लाविली तर मग हा कोणासही आटोपणार नाहीं. ह्मणून ए-वढ्या गोष्टीचें मात्र पकें स्मरण ठेवावें. नंतर तो घोडा राजानें आपले पागेंत ठेविला. त्यास कांहीं दिवस लोटल्या नंतर एके दिवशीं विक्रम अश्वशाळेंत गेला आणि जवळ सरदार होते त्यांस ह्मणतो अहो याजवर तुह्मांस बसतां यईल काय? त्याणीं उत्तर केलें. याजवर बसून याला फिरविणें हें कर्म सामान्याचे नव्हे. तेव्हां राजा मी बसतों असें ह्मणून त्याजवर बसला. आणि त्यास फिरवूं लागला असतां विसरून त्यास टांच मारिली. मारतांच तो उडून आकाशमार्गे जाऊं लागला. तें पाहून सर्व लोक हाहाकार करूंलागले मग तो घोडा मोठ्या एका वृक्षास अडकला. तेव्हां विक्रम झाडा खालीं उतरून त्या अरण्यांत चहूंकडे फिरूंलागला. तो एका झाडाजवळ दोन विहिरी आणि एक बंगला आहे असें पाहून तेथें जवळ गेला तों त्या बंगल्यांत पलंगादिक सर्व साहित्य ठेविलें आहे, आणि एक वानरी बसली आहे. असे पाहिलें. आणि चित्तांत ह्मणतो येथें कोणी लपून राहिला आहे काय? किंवा कोणी कारणास्तव साहित्य आणिलें असेल काय? मग तो याचा शोध लागावा ह्मणून झाडावर बसला इतक्यांत तेथें एक यति येऊन त्याणें डावेहाताच्या विहिरीतले पाणी काढिलें आणि त्या वानरीचे अंगावर शिंपिलें तेव्हां ती स्त्री होऊन त्या यतीबरोबर विलास करूं लागली. नंतर त्याणें जाते समयीं उजव्या हातच्या विहिरींतलें पाणी तिजवर शिंपून पुनःतीस वानरीकेली. आणि आपण निघून गेला. तें आश्चर्य पाहून विक्रम झाडा खालीं उतरला. आणि त्याणें त्या विहिरींतलें पाणीं काढून वानरीच्या अंगावरटांकिलें. तेव्हां स्त्री होऊन बोलली हे उदारा मला या दुखापासून सोडीव. विक्रम ह्मणाला. तू येथें कशी आलीस? ती बोलली मी लहानपणीं नकळतां आई बापांची कांहीं अमर्यादा केली. ह्मणून त्याणीं

मला या यतीचे स्वाधीन केलें. हा दुष्ट माझे हाल फार करितो. असें तिचें भाषण ऐकून विक्रमास तिची दया आली. आणि त्याणें बीराचें स्मरण केलें. तेव्हां तीन बीर समोर येऊन उभेराहिले. मग विक्रम एकाच्या खांद्यावर त्या स्त्रीस बसवूंन आपण एकावर बसला आणि एकाकरवीं तो लांकडाचा घोडा घेऊन अवंतीस येता झाला. अशी कथा ऐकूंन भोजराजा माघारा गेला. दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला. तों हंस गमना चोविसावी पुतळी बोलली हे भोजराजा तुला गोष्ट सांगतें ऐक.

## कथा २४.

एके दिवशीं अवंतीस कोणी एके स्त्रीनें एका सावकाराच्या पुत्रास. आज रात्रीं माझ्या घरीं ये, ह्मणून खूण केली. तें विक्रमानें पाहिलें आणि ह्मणतो हर हर! माझ्या राज्यांत असा अधर्म घडूं नये. मी याचें निवारण करावें. ह्मटलें आहे. राज्यांत अधर्म होतो तो समजला असतां जो राजा त्याचें निवारण करीत नाहीं तो त्या पातकाचा करविता होतो. असे मनांत आणून रात्रीं राजा तिच्या घराजवळ गेला आणि खिडकीं तून बारिक खडे मारूं लागला. तेव्हां ती समजली कीं, आपण ज्यास दिवसा बोलाविलें तो आपली खूण समजून आला आहे तर अशा चतुरा बरोबर देशांतरीं जाऊन यथेच्छ सुख भोगावें. असा निश्चय करून ती रत्न भूषणाची पेटी घेऊन त्याच्या जवळ आली आणि ह्मणाली सख्या चला आपण दोघें देशांतरीं जाऊं आणि सुखानें राहूं राजा बरें ह्मणाला. आणि तिला घेऊन चालला. तो नदी उतरून एका नगरांत गेला, तेथें एका झाडा खालीं उभयतां बसलीं. मग राजा तीस ह्मणतो गडे हें कर्म तूं वाईट केलेंस. या व्यभिचार कर्मांत परलोकीं तर सुख नाहींच या लोकीं आहे ह्मणावें तर तेंही नाहीं जो लबाड, ठक, कृत्रिमि, घातकी आणि गरजू असतो तोच पुरुष जार कर्मास झटतो. तर अशा-

च्या संगतींत सुख कैंचें? व्यभिचार कर्मास राजाचें भय. स्वजनांचें भय. ज्ञाती भय. असें हें कर्म मोठें निंद्य होय. ह्मणून यांत कांहीं सुख नाहीं. पहा बरें जर मी तुला या तरवारीनें येथें हाणून द्रव्य घेऊन गेलों तर तूं काय करशील? असेंराजाचें भाषण ऐकून तिची व्यभिचार बुद्धि गेली. आणि ती राजास नमस्कार करून बोलली तूं धन्य आहेस. मी नरकांत पडत होतें. त्यांतून मला आज तूं राखिलेंस तर आतां मला तूं घरीं नेऊन घाल. अतःपरमी असें कर्म करणार नाहीं. नंतर राजानें तिला तिचे घरीं पोंचविलें आणि आपण घरीं येता झाला. ही कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. दुसरें दिवशीं सिंहासनाजवळ आला तेव्हां रूपकांती पंचवीसावी पुतळी बोलली हे भोजराजा मी एक विक्रमाची कथा सांगतें ती श्रवण कर.

## कथा २५ वी.

एके दिवशीं विक्रमराजा आपले रंगमाहालांत गायन ऐकत असतां शिवपूजेची वेळ टळली तेव्हां पश्चाताप पावून ह्मणतो हर हर! मला धिःकार असो कीं, मी विलासांत पडून आज एवढे वर्षांचें व्रत मोडलें. मी विषयांत पडून मोठें मूर्खपण केलें तर मी आतां तप करून शिवाची कृपा संपादीन. असा निश्चय करून त्याणें प्रधानाचे स्वाधीन राज्य केलें. आणि तत्क्षणींच आपण नर्मदातीरीं एका अरण्यांत तप करावयास गेला. तेथें अनेक तपस्वी तप करीत होते. कोणी पंचाग्नि साधनी. कोणी धूम्रपानी. कोणी ऊर्ध्वबाहू, पर्णाशनी. वायुभक्षक, ध्यानी, पूजक, वेदांतविचारी. चांद्रायणादिक व्रतकर्ते. योगाभ्यास करणारे, कोणी आपले शरीराचा होम करणारे असत तेथें विक्रमानें तीस वर्षें तप केलें. तेव्हां महादेव प्रसन्न होऊन वर माग ह्मणाले. विक्रम साष्टांग नमस्कार करून बोलला. हे देवा, मला आपले जवळ ठेवा. आणि जे येथें तुझ्या द-

र्शनाकरितां आज बहुत वर्षें तपश्चर्या करीत आहेत आणि जे करितां करितां मरण पावले. त्या सर्वांस कृपा करून भेट द्यावी एवढें मागतों. असें विक्रमाचें भाषण ऐकून ईश्वरानें आपल्या गणास आज्ञा केली कीं, जे तपस्वी मरण पावले आहेत त्यांस जिवंत कर. तें ऐकून तो गण तपस्व्यांच्या अस्थीवर अमृत शिंपिता झाला. ते समयीं एक एक तपस्वी जिवंत होऊन शिवशिव, हर हर असा जप करीत आनंदानें नांचूं लागले. मग त्या सर्वांस महादेवानें दर्शन दिलें. आणि विक्रमास एक कमलाचें फूल देऊन सांगितलें कीं, हें कमल जेव्हां कोमेल तेव्हां तूं समज कीं, आतां आपलें आयुष्य साहा महिनें राहिलें आहे. मग तूं माझ्या जवळ ये. आतां तूं जाऊन राज्य कर. असें सांगून महादेव गुप्त झाले. नंतर विक्रम ईश्वराचे आज्ञेस्तव उज्जनीस आला. आणि पुनः राज्य करूं लागला. ही कथा सांगून रूपकांता ह्मणाली. ज्याला महादेवानें राज्य कर अशी आज्ञा केली. अशाचे आसनावर बसणारा असा कोण समर्थ आहे तें ऐकून भोजराजा माघारा गेला दुसरे दिवशीं आला असतां देवनंदा सव्विसावी पुतळी बोलली. हे भोजराजा सर्वांनीं तुला कथा सांगितल्या आतां मी ही एक कथा सांगतें श्रवण कर.

## कथा २६ वी.

कोणे एके समयीं विक्रमराजा आपल्या प्रधानांस निती सांगता झाला. हे प्रधान हो, ऐका. ज्ञानावांचून लटकेंच वैराग्य दाखवूं नये. मित्रास दुखवूं नये. अपराधावांचून कोणावर रागें भरूं नये. कोणास वाईट बोलूं नये. दुर्जनाची संगत करूं नये. मोठ्या अन्यायाशिवाय स्वस्त्रीस टाकूं नये. कोणी भविष्य सांगेल त्याची काळजी करूं नये. लक्ष्मी स्थीर राहील असा भरंवसा धरूं नये, चोरास ओळख देऊं नये, दान पुण्यावांचून मुधा दिवस जाऊं देऊं नये. ईश्वराचें भजन निरंतर करावें आ-

इबापांचा उपदेश ऐकावा. नीचाची संगत धरूं नने. खोटी साक्ष दे
नये. मोठ्या लाभाकरितां पापकर्म करूं नये. देश, कालवर्त्तमान जा०
जें करणें तें करावें. कोणाच्या लाभास आड येऊं नये. थट्टा करूं न-
सर्वांशीं मिळून असावें बहुतांचे मतास येईल तें करावें. अडल्याचें स
हित्य करावें. दुसऱ्याच्या भाग्याची अदेखाई न करावी, यौवन, ध
आणि आयुष्य हीं चंचळ जाणावीं, एकल्यानें देशांतरीं जाऊं न-
आपल्या सामर्थ्याप्रमाणें धर्म करावा. पुत्राचा फार लाड करूं न-
ज्याला देऊं केलें त्याला सत्वर द्यावें, काया, वाचा, मनानें नित्य पर
पकार करावा. मर्म कोणाचें काढूं नये. कोणाचें गुह्य उघडें करूं न
सत्कर्मास द्रव्य खर्चेलें तें व्यर्थ गेलें असें मानूं नये. नास्तिकपणा ध
नये; आपले योग्यते प्रमाणें इच्छा करावी. प्रशंसेस भुलूं नये. अंतःकर
स्वस्थ ठेवावें. आपली विपत्ति निष्फल सांगूं नये, द्यूतकर्म करूं न
दुसऱ्याचें वित्त हरण करूं नये. परस्त्रीवर इच्छा करूं नये, प्राप्तीपेक्ष
उणा खर्च करावा ऋण काढून सण करू नये. आपल्या पराक्रमानें पोट भरा
विद्येविषयीं तृप्त होऊं नये. आशा मारावी, काम जिंकावा, क्रोध अ
वरावा, मत्सर सोडावा, मद जिंकावा, मोह खंडावा, मृत्यूची आठव
नित्य ठेवावी, मनात ईश्वराचें भय वागवावें, प्राणिमात्रांवर दया करा
सपत्तींत पूर्व स्थिति विसरूं नये, विपत्तींत धैर्य सोडूं नये, चुकी पद
घ्यावी, दुसऱ्याचा गुण घ्यावा. चौघांच्या कल्याणाच्या कामांत प्
सरावें, ज्यांत आपला नाश आहे तें कर्म इंद्रियांस आवडतें ह्मणून क
नये. देह सोडिल्यावर मागे कीर्ति राहील असें कर्म करावें, नम्र आ
मधुर असें भाषण करावें. दुसऱ्यास बरा मार्ग दाखवावा. याप्रमाणें
वनंदचे मुखांतून विक्रमाची नीति ऐकून भोजराजा माघारा गेला. दु
दिवशीं सिंहासनाजवळ आला. तेव्हां देवांगना सत्ताविसावी ५० कथा

## कथा २७.

राजा विक्रम राज्य करीत असतां एक सिद्धांती जोशी आला. त्याणें राजास सांगितलें. मी भूत भविष्य वर्तमान हीं सर्व जाणतों. त्यास राजानें पुसलें या वर्षांत प्रजेस पर्जन्य सुख कसें आहे? जोशी ह्मणाला महाराज, यंदा रविमध्य योग आहे या कारितां पर्जन्य पडणार नाहीं.

बुधशुक्रौसमीपस्थौकुरुतःसजलांमहीं ॥
तयोरंतर्गतोभानुःसमुद्रमपिशोषयेत् ॥

अर्थ.—बुध आणि शुक्र हे दोघे जवळ असले तर वृष्टि पुष्कळ होते आणि त्यांच्या मध्यें सूर्य असला तर पर्जन्य पडत नाहीं. तेव्हां विक्रमानें थोर थोर ब्राह्मणांस बोलावून विचारिलें कीं, पर्जन्य पडावयास काय उपाय करावा? ते ह्मणाले वाजपेय यज्ञ करावा. मग विक्रमानें यज्ञास आरंभ केला. त्या यज्ञ समारंभा मध्यें जेजे याचक आले त्यांचा त्याणें यथायोग्य सत्कार केला. यज्ञ समाप्तीचे वेळेस इंद्रादिक देव प्रत्यक्ष येऊन विक्रमास बोलले राजा, आह्मी प्रसन्न झालों, आतां वर माग. विक्रम ह्मणाला आज पासून कधींही माझ्या देशांत अवर्षण होऊं नये. तें मान्य करून देव आपल्या स्थानास गेले. मग विक्रमानें कोट्यावधी ब्राह्मणांस व इतर याचकांस मिष्टान्न भोजन घातलें. आणि दक्षिणा देऊन संतुष्ट केलें. त्या दिवसा पासून पुढें मालवं देशांत कधींही अवर्षण पडलें नाहीं ही कथा ऐकून भोज राजा माघारा गेला. दुसरे दिवशीं आला तेव्हां चित्रिणी अठ्ठाविसावी पुतळी बोलली हे भोजराजा, मीहि तुला एक विक्रमाची कथा सांगतें ती ऐक. आणि मग या सिंहासनावर बैस.

## कथा २८ वी.

एके समयीं विक्रमराजा अरण्यांत शिकारीस गेलाहोता. तेथें यम आ-

णि वरुण दोघे देव त्याचें सत्व पाहावयास आले. यम वाघाचें रूप धरून पाठी मागें लागला. आणि वरुण रोडक्या गायीचें रूप धरून भयानें घाबरा घाबरा राजाजवळ आला. आणि ह्मणाला राजा, मी तुला शरण आलें. माझें रक्षण कर. तें ऐकून विक्रमास दया आली. आणि तरवार घेऊन त्या गायी भोंवता फिरूं लागला. वाघ राहून राहून गायीवर झडपा मारितो आहे, अशा संधींत मोठा पाऊस येऊन बहुत चिखल झाला त्यांत ती गाय बसली; तेव्हां वाघ भूमीवर पुच्छ आपटून मोठा भयंकर शब्द करीत घटिके घटिकेस चवताळून तिजवर येत असे या प्रमाणें राजानें पावसांत उभा राहून सर्वरात्र काढिली. प्रातःकाळ होतांच यम आणि वरुण दोघेही देव प्रगट होऊन बोलले राजा, आह्मी देव तुझें सत्व पहावयास आलों होतों. तर तुझें सत्व पाहून प्रसन्न झालों. आतां तुझ्या इच्छेस येईल तो वर माग. राजा ह्मणाला तुमच्या प्रसादानें मला सर्व आहे. उणें कांहीं नाहीं. तर हें मागतों कीं, आपली कृपा असावी. तें ऐकून त्यांणीं त्यास स्वर्गांची कामधेनू दिली ती घेऊन राजा उज्जनीस येत असतां मार्गांत एका दरिद्री ब्राह्मणानें ती मागितली. विक्रमराजा त्यास देता झाला. अशी कथा ऐकून भोजराजा माघारा गेला दुसरे दिवशीं त्या सिंहासना जवळ आला. तेव्हां सुलो चना एकुणतिसावी पुतळी बोलली हे भोजराजा, मी हीएक कथा सांगतें ती श्रवण कर.

## कथा २९ वी.

एके दिवशीं विक्रमराजा उज्जनींत चोर बातमीस रात्रीस फिरत असतां एका दरिद्री ब्राह्मणाच्या घराजवळ आला. तो ब्राह्मण आणि त्याची स्त्री उभयतां कांहीं बोलत होतीं तें ऐकावें ह्मणून बाहेर उभा राहिला. ते समयीं ती पतीस ह्मणते, स्वामी, आपण दारिद्रा मुळें फार दुःख पावतां, ते विक्रमा जवळ याचनेस कां जाना? ब्राह्मण सांगतो अगे सध्या

आपल्यास काळ प्रतिकूळ आहे माझी विपत्ति राज्याच्यानें हीं दूर होणार नाहीं. तें ऐकून विक्रम आपल्या घरास गेला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं त्या ब्राह्मणास बोलावून आणिलें आणि कोहाळयांत गुप्त रत्नें भरून तें त्यास दान दिलें. तें न समजतां ब्राह्मणानें एका सराफास विकलें. आणि पैसे घेऊन घरास आला. पुनः त्या रात्रीस राजा ब्राह्मणाचे घराजवळ आला, आणि ऐकतो आहे तों ब्राह्मण स्त्रीस ह्मणतो. पाहिलासना चमत्कार! कीं, जो राजा याचकांस लाखो रुपये देतो त्याणें मला मुजरत बोलावून एकच कोहळा दिला. तो बाजारांत एका चवलास गेला. हा शब्द माझ्या प्रारब्धाकडे. राजाकडे नाहीं. तें ऐकून विक्रम खिन्न झाला. आणि मनांत ह्मणतो हा काळ यास प्रतिकूळ आहे खरा. यास आणखी द्रव्य देऊन तरी काय फळ! तर आतां काय करावें? कसें केल्यानें हा सुखी होईल? अशी चिंता करितो आहे तों तेथें एक पुरुष आला आणि ब्राह्मणाचे घरांत जाऊं लागला. त्यास राजानें विचारिलें तूं कोण आहेस? आणि एवढ्या रात्रीस या घरांत जावयाचें काय तुझें कारण आहे तें सांग? त्याणें उत्तर केलें ज्यास काळ ह्मणतात तो मी ह्या ब्राह्मणास छळावयास जात आहें. राजा नमस्कार करून बोलला देवा, माझी एवढी प्रार्थना ऐक. कीं, तूं याच्या वांट्यांचें मला छळ आणि याला सुख दे. काल बोलला बरें तर, एक वर्ष पर्यंत तुला पीडीन, असें बोलून गुप्त झाला. राजा आपले घरीं येऊन निजला. ब्राह्मणास ही झोंप लागली. दुसरे दिवशीं प्रातः काळीं सराफानें कोहळा चिरला तों आंत रत्नें निघालीं. तीं पाहून सराफ समजला आणि ह्मणतो हें राजानें त्या ब्राह्मणास गुप्त दान दिलेलें आहे. "हर हर! हें ब्राह्मणाचें द्रव्य कोणीं घ्यावें? ह्मटलें आहे". दुसऱ्यानें नकळून दिलेली किंवा मार्गावर पडलेली दुसऱ्याची वस्तु घेणें हें चौर्य कर्म होय. मग तो रत्नभरित कोहळयाचीं दोन

अर्थ घेऊन ब्राह्मणाचे घरीं आला आणि नमस्कार करून बोलला भटजी बावा, आपल्यास राजानें गुप्त दान दिलें होतें हें आपलें संभाळावें. तें पाहून ब्राह्मण बहुत हर्षेला. आणि स्त्रीसहित आनंदानें प्रपंच करूं लागला. इकडे त्याच रात्रीस राजाच्या भांडार शाळेंत. चोरी झाली. तिची प्रातः काळीं चौकशी करिताहेत, तों कोठी, महाल, पागा, राजवाडा यांस एकदांच आग लागली आणि सर्व जळालें. तेव्हां विक्रम राजा प्रधानास रात्रींचें वर्तमान सांगून आपण सेतुबंध रामेश्वारास गेला. तेथें देवळांत तप करीत होता. तों एके दिवशीं चंदी चंदावरचा राजा देवाचे यात्रेस आला. तों विक्रमाचें अत्यंत सुंदर स्वरूप पाहून परम आनंद पावला. आणि बोलतो हे महा पुरुषा तुला पाहून मी फार समाधान पावलों; मी इच्छितो कीं, माझ्याजवळ तूं सदां असावेंस विक्रम बरें ह्मणाला मग तो राजा विक्रमास आपले पट्टणास घेऊन गेला तेथें एके दिवशीं असें झालें कीं, राजाची स्त्री विक्रमा पाशीं गोष्टी सांगत बसलीआहे तों तिची न्हाण्याची वेळ झाली तेव्हां ती गळ्यांतील नवरत्नाचा हार समोरच्या खुंटीवर ठेवून बोलली हे गुरुजी, मी न्हाऊन येतें तों पर्यंत आपण हा हार पहावा असें बोलून ती गेली विक्रम ही हाराकडे पहात बसला आहे त्या वेळीं काळानें त्या खुंटींत प्रवेश करून हार गिळिला. तो पाहून विक्रम विचार करितो कीं, हें अघटित कर्म घडलें. हें जर लोकांस सांगावें तर खरें वाटणार नाहीं परंतु आपण सांगावें. जें होणार तें होवो असत्य भाषण सर्वथा करूं नयें. असा निश्चय करून तसाच बसला. आहे, इतक्यांत राजपत्नी येऊन पुसूं लागली कीं, येथील हार काय झाला? त्याणें झालेलें वर्तमान सांगितलें ती ह्मणाली तुह्मी माझी मस्करी करितां, विक्रम उगाच राहिला. तिणें तें वर्तमान आपल्या पतीस सांगितलें. राजा येऊन विक्रमास एकांतीं पुसू लागला कीं, हार काय झाला? तें

सांग? त्याणें झालेलें वर्तमान सांगितलें तें खरें न वाटून राजास फार क्रोध आला. आणि त्याचे हात पाय तोडविता झाला.

विक्रमराजा त्या दुःखानें फार व्याकुळ होऊन रस्त्यांत पडला आहे तों तेथें एक तेली आला त्यास दया येऊन विक्रमास त्याणें आपले घरीं नेलें. आणि औषध लावून बरें केलें. मग ह्मणाला थोंट्या, तूं माझ्या घाण्यावर बसून बैल हाकीत जा. तें ऐकून विक्रम ह्मणाला. तुझ्या घरांत जितक्या तेलाच्या घागरी असतील तितक्या मी मंत्रानें भरून ठेवितों. त्यांतून तूं कितीही तेल काढिलेंस तरी उणें होणार नाहीं. मग घाण्याचें काय काम? असें बोलून विक्रमानें तसें केलें. तेव्हां हजारों रुपयांची विक्री नित्य होऊं लागली. नंतर तो तेली मोठा एक बंगला बांधून त्यांत थोंट्यास ठेविता झाला. तेथें जवळच राजकन्येचा वाडा होता. एके दिवशीं विक्रमराजा गायन करीत असतां दीपराग आलापूं लागला. तेणें करून राज कन्येच्या मंदिरांतील दिवे विझाले होते ते पुनः लागले. तिणें तो शोध करून आपल्या पित्यास सांगितलें कीं, जो पुरुष दीपराग ह्मणून दीप लावील त्यास मी पती करीन असा माझा निश्चय झाला ह्मणून मी तेल्याच्या पुत्रास नवरा करिवें. तें ऐकून मातापितरांनीं बहुत निषेध केला. तथापि तिणें तोच थोंटा पति केला. एकें समयीं एकांतीं राज कन्येनें थोंट्यास पुसलें कीं, तूं कोठचा कोण आहेस? त्याणें झालेलें वर्तमान सर्व सांगितलें. तें ऐकून ती विक्रम माझा पति अशा संतोषानें त्याची बहुत सेवा करूं लागली. तेथें एके दिवशीं असें झालें कीं, त्या चंबीचंदां वरच्या राजाकडे विलायतेच्या राजानें तीन सोन्याच्या पुतळ्या वजनांत व आकृतींत एक सारिख्या पाठवून विचारिलें कीं. यांत उत्तम, मध्यम, कनिष्ठ, कोणती ती सांगावी. राजानें चार चतुर लोक बोलावून परीक्षा केली. परंतु कोणासही त्यांत अधिक उणें आढळेना. राजा चिंत-

स पडला आहे. इतक्यांत. तेथें लक्ष्मी, बुद्धि, सत्य, आणि काळ हीं चौघें जणें आलीं आणि बोलली, राजा, आह्मांत थोर कोणतें सांग? राजानें विचार केला परंतु चोघेंही थोरच दिसून आलीं. लहान मोठें कांहीं कळेना, तेव्हां तो चिंतेंत पडला. तें वर्तमान राजकन्येनें थोंट्यास सांगितलें. थोंटा ह्मणाला माझे संकटकाळाचे दिवस तीन उरले आहेत. ते सरले ह्मणजे मी निवाडा करीन. नंतर चवथे दिवशीं राजानें थोंट्यास बोलावून आणिलें. तो ह्मणाला मागें मीं जेथें बसलों असतां खुंटीनें हार गिळला आहे तेथें बैठक करावी. प्रधानानें तसें केलें. नंतर थोंट्यानें त्या तीन पुतळ्या आणवून फार वेळ परीक्षा केली परंतु त्यांत कांहींच अधिकउणें दिसेना. तेव्हां तिघींच्या कानांत काडी घालविली. तों एकीच्या तोंडांतून बाहेर निघाली. दुसरीची दुसरे कानांतून निघाली. तिसरीची पोटांत गेली. असें पाहून त्याणें राजास सांगितलें कीं, जिच्या तोंडांतून बाहेर काडी निघाली ती पुतळी कनिष्ठ होय कीं, तिला कांहीं गोष्ट सांगितली तर दुसऱ्या जवळ सांगेल. व जिच्या कानांतून निघाली ती मध्यम कीं, ती एका कानानें गोष्ट ऐकून दुसऱ्या कानानें सोडील. मनांत धरणार नाहीं. जिच्या पोटांत काडी राहिली ती उत्तम कीं, तिला कांहीं गोष्ट सांगीतली तर मनांत ठेवील कोणापाशीं सांगणार नाहीं. तें विक्रमाचें चातुर्य पाहून सर्वांस आनंद झाला. नंतर लक्ष्मी पुढें येऊन बोलली कीं, सर्वां पेक्षां मी थोर आहें तीस विक्रमानें विचारिलें कीं, जर तूं थोर तर विक्रमास काळ प्रतिकूळ झाला ते समयीं तुझें कांहींच चाललें नाहीं, ती निरुत्तर झाली. मग बुद्धि ह्मणाली मी थोर, त्याणें तिलाही तसेंच विचारिलें तें ऐकून तीं ही उगीच बसली. मग सत्य बोललें सर्वांपेक्षां मी मोठें त्यास ही त्याणें तसेंच पुसतांच तें हीं निरुत्तर झालें. मग मूर्तिमंत काळ येऊन उभा राहिला त्यास पाहातांच थोट्यानें नमस्कार केला. इ-

जक्यांत खुंटींत हार गेला होता तो बाहेर आला तेव्हां थोंटा काळास ह्मणतो, तूं प्रतिकूळ असतां कोणाचाही उपाय चालत नाहीं ह्मणून तूंच थोर. लक्ष्मी, बुद्धि आणि सत्य हीं, तूं अनुकूळ आहेस तरच सुख देऊं सकतात. तुज वांचून यांस सामर्थ्य नाहीं. असें त्याचें भाषण ऐकून काळ संतुष्ट झाला आणि विक्रमास हातानें कुर्वाळिता झाला. तेणें करून त्यास हात पाय फुटले आणि शरीर पूर्ववत झालें तें पाहून सर्वांस आनंद झाला. आणि आप आपले स्थानास गेले मग विक्रमानें त्या तेल्यास तेथील अर्धराज्य देवविलें आणि स्त्री सहित आपण उज्जनीस आला ही कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं आला तेव्हां प्रेमावती तिसावी पुतळी बोलली, हे भोजराजा, आतांमी एक कथा सांगतें ऐक.

## कथा ३० वी.

विक्रमराजा राज्य करीत असतां कपिलाषष्ठीचें पर्व आलें ते दिवशीं राजा गंगास्नानास गेला. तेथें विद्वान तपोनिधी असे ब्राह्मण गरीब दुबळेही बहुत मिळाले होते त्यांस पाहून राजाच्या मनांत आलें कीं; असें पर्व पुढें येईल मग मी धर्म करीन असा भरंवसा धरूं नये. आयुष्यादिक सर्व चंचळ आहेत. या विषयीं वचन सांगितलें आहें तें हें कीं, श्लोक.

**अस्थिरंजीवितंलोकेअस्थिरेधनयौवने ॥**
**अस्थिराःपुत्रदाराश्चधर्मःकीर्तिर्द्वयंस्थिरम् ॥ १ ॥**

अर्थ—मृत्युलोकीं आयुष्य अशाश्वत आहे तशींच, धन, तारुण्य, पुत्र, स्त्रिया हीं ही क्षणिक होत. धर्म आणि कीर्ति हीं दोनच शाश्वत आहेत; तर जें शाश्वत आहे; असा निश्चय करून त्यानें ब्राह्मणांस अनेक प्रकारचीं दानें दिलीं. व इतर याचकांस ही बहुत धन

दिलें सर्वांस अन्नदान केलें आणि आपण भोजन करून बसला आहे. इतक्यांत तेथें एक गारोडी आला, तो ह्मणाला महाराज मी खेळ करितों तो आपण आवकाशें करून पहावा. असें बोलून तो साहित्य आणावयास गेला. तों एक शिपाई घोड्यावर बसून स्त्री सहित तेथें आला आणि राजास राम राम करून उभाराहिला. त्यास प्रधानानें पुसलें. तूं कोण कोठून आलास? तो ह्मणाला मी इंद्राचा दूत, मला इंद्रानें कांहीं कारणास्तव शापिलें ह्मणून मी इंद्राचा दूत, मला इंद्रानें कांहीं कारणास्तव शापिलें ह्मणून मी मृत्युलोकीं राहात असतों. माझी कांहीं विनंती आहे ती ऐकावी. आज देव दैत्यांशीं युद्धप्रसंग होणार त्याकरितां मला इंद्रानें स्वर्गी बोलाविलें आहे. ही माझी स्त्री सकुमार व लहान आहे इला युद्धांत नेतां येत नाहीं भलत्याजवळ ही ठेवून जाववत नाहीं अशा अडचणींत मी पडलों आहें ह्मणून मी येथें आलों आहें. विक्रमराजास परस्त्री कन्येसारिखी. अशी कीर्ति ऐकून मी येथें आलों आणि असें इच्छितों कीं, तुह्मांपाशीं ही स्त्री ठेवून स्वर्गास जातों. तेथून येई तोंपर्यंत माझ्या स्त्रीचा सांभाळ आपण करावा. राजा बरें ह्मणाला. नंतर तो शिपाई राजाजवळ स्त्री ठेवून आकाशांत उडून गेला. त्यास अर्धी घटिका झाली नाहीं तों अकस्मात् मोठा शब्द होऊन एक भुज भूमिवर पडली. ती पाहून ती स्त्री राजास ह्मणाली, हे महाराज, माझा पति युद्धांत पडला ह्मणून त्याची भुज येथें आली आतां इच्याबरोबर मी सती जात्यें. राजानें सांगितलें कीं, तुला पाहिजे तें देतों तूं सहगमन करूं नको. तिणें उत्तर केलें कीं, पतीनें मला स्वर्गास न्यावयाकरितां ही भुज मूळ पाठविली आहे. आतां मी कशी राहूं? तर आपण माझे आई बाप, माझी पाठवणी करावी. तें ऐकून विक्रमानें तिचें साहित्य केलें. मग तिणें त्या भुजेबरोबर अग्नींत प्रवेश केला. इतक्यांत तो स्वार आ-

काशांतून खालीं उतरला आणि राजास नमस्कार करून ह्मणाला महाराज माझें बळ पाहून इंद्रानें मला कुटुंबासहित स्वर्गास बोलाविलें आहे. तर माझी स्त्री मला द्यावी. राजा बोलला कीं, तिणें सहगमन केलें-सर्वांनींही तसेंच सांगितलें तें ऐकून तो ह्मणाला मी जिवंत असतां ती सती कोणाबरोबर गेली? व तुह्मी अशी विपरोत साक्ष कशी देतां तें ऐकून राजा लज्जेनें खालीं पाहूं लागला. इतक्यांत तो गारोडी होऊन राजास राम राम करून बोलला महाराज मी हा एक आपणास चमत्कार दाखविला. आतां दुसरा पाहावा. नंतर त्याणें त्या स्त्रीस हाक मारितांच ती अग्नींतून बाहेर येऊन विक्रमापुढें हात जोडून उभी राहिली तें पाहून सर्व लोक आश्चर्य करूं लागले. मग विक्रमानें त्या गारोड्यास लक्ष रुपये व पांच गांव इनाम दिले. ही कथा ऐकून भोजराजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला. तेव्हां गुणप्रिया एकतिसावी पुतळी बोलली राजा श्रवण कर.

## कथा ३१.

महादेवानें विक्रमराजास कमलाचें फूल दिलें होतें तें सुकलें असें पाहून विक्रमराजास कळलें कीं, आपला मृत्यु साहा महिन्यांनीं होणार तेव्हां राजानें सर्व राज्य प्रधानाचे स्वाधीन केलें आणि आपण वाईक्षेत्रीं जाऊन राहिला. आणि सर्व राज्यांत दौंडी पिटविली कीं, ज्यास कांहीं मागावयाचें असेल त्याणीं वाईत येऊन मागावें. तें ऐकून नानादेशींचे याचक, भट्ट, पंडित, भिकारी, फकीर, वाईस आले. राजा, सर्वांस मागितलें तें देऊन संतुष्ट करितो आहे हें वर्तमान कळून देवही परिक्षा पाहावया करितां तेथें आले आणि बहुत कठीण मागणीं मागितलीं. तीं विक्रमानें अनेक प्रकारचे कष्ट भोगूनही त्यांस दिलीं. तेव्हां देव प्रसन्न होऊन बोलले हे राजा, तुजसारिखा दुसरा पुरुष या कलियुगांत होणार

नाहीं मागें सत्य युगांत जसा सत्यवादी हरिश्चंद्र राजा झाला. त्रेता युगांत जसाबली महादाता. झाला द्वापार युगांत जसा दशरथ राजा महा प्रतापी झाला ते त्यांचे तिन्ही गुण तुझ्यांत आहेत या करितां तूं त्यांहून श्रेष्ठ होस, असें बोलून देव गेले. एके दिवशीं विक्रम राजा कृष्णेचें तीरीं बसला होता, तेथें एक सुवर्ण कांतीचें हरण आलें आणि तें मनुष्य वाणीनें राजास बोललें राजा. मी पूर्वजन्मीं ब्राह्मण होतों एके दिवशीं भुकेनें पीडित होऊन फिरत असतां मला एक सिद्ध भेटला त्याजवळ मी क्षुधेच्या दुःखास्तव मरण मागितलें तेव्हां त्याणें मला हरण करून सांगितलें कीं, आजपासून तुला भुकेची पीडा होणार नाहीं. पुढें राजावीर विक्रमादित्य होईल त्या जवळ तूं आपलें वर्तमान सांगितलें ह्मणजे जन्मापासून सुटशील आणि तो तुला आपले पुण्यानें स्वर्गास पोंचवील असेंबोलून हरिणानें प्राण सोडिला. नंतर विक्रमानें त्याच्या प्रेताचें दहन करून त्यास स्वर्ग प्राप्त व्हावयाकरितां यज्ञ आणि दानें बहुत केलीं तेणें करून तो दिव्यशरीरी होऊन स्वर्गलोकास गेला. ही कथा ऐकून भोज राजा माघारा गेला. पुनः दुसरे दिवशीं सिंहासनाजवळ आला तों चित्रकळा बत्तिसावी पुतळी बोलली हे भोजराजा, सर्वांनीं कथा तुला सांगितल्या. आतां शेवटील कथा मी सांगतें.

## कथा ३२.

ज्या वेळेस विक्रमाचा अंतसमय आला तेव्हां इंद्रानें विक्रमास आणावया करितां आपलें विमान पाठविलें त्यांत बसून विक्रम स्वर्ग लोकास गेला. त्या काळीं अवंती नगरींत मोठा अनर्थ झाला. सर्व लोक हाहाकार करूं लागले. कारभारी, भट्ट, भिक्षुक, फकीर, गरीब व दुबळे व सर्व जन ह्मणूं लागले कीं. आज धर्म बुडाला. परोपकार, दया, दान, इत्यादि सर्व गुण लयास गेले. राज्याच्या स्त्रिया सती गेल्या. व दास,

दासी, सेवक, शिपाई, सरदार, मानकरी, ह्मणूं लागले. धिक आमचें जिणें व जन्म. कीं, आमच्चांत असा कोणी नाहीं कीं, जो विक्रमास माघारा फिरवील असा राज्यांत मोठा अनर्थ झाला नंतर प्रधानानें जैत्रपाळ राजपुत्रास टिका करून सर्व राज्यांत त्याच्या नांवानें दौंडी पिटविली. आणि विक्रमाचें क्रियाकर्म करविलें नंतर जैत्रपाळ सिंहासनावर बसूं लागला. तों तात्काळ मूर्च्छा येऊन वरून खालीं पडला तेव्हां मंत्री ह्मणाला महाराज; रात्रीं राजाचें स्मरण करून प्रार्थना करावी आणि भूमीवर निजावें. मग जशी आज्ञा होईल त्या प्रमाणें करावें. तें ऐकून रात्रीं जैत्रपाळ भूमीवर निजला. त्यास दृष्टांत झाला कीं, तूं उज्जनी व धारा नगरी हीं दोन्हीं सोडून अवंतीस राहा. आणि हें सिंहासन भूमीत पुरून ठेव. या प्रमाणें स्वप्नांत विक्रमानें सांगितलें. नंतर प्रातः काळीं उठून प्रधानादिकांस तें सर्व वर्तमान जैत्रपाळानें सांगितलें तेव्हां बेलदारांस बोलावून तें सिंहासन भूमींत पुरून ठेविलें आणि आपण अवंतीस येऊन राज्य करूं लागला. इतकी कथा सांगून चित्रकळा बोलली हे भोजराजा आतां आमचें वर्तमान ऐक आह्मीं बत्तीस जणी पार्वतीच्या सख्या होतों. एके दिवशीं शिवाचें स्वरूप अत्यंत वृद्ध, रुंड माळांनीं वेष्टित; गजचर्माच्छादित, नागपाशानीं बद्ध, चिताभस्मानें लिप्त असें पाहून आह्मांस हसूं आलें तेव्हां महादेवानें आह्मांस शापदिल्हा कीं. निर्जीव होऊन तुह्मी पृथ्वीवर राहाल हें ऐकून पार्वतीनें प्रार्थना केली मग महादेवानें कृपाळू होऊन आह्मांस उश्शाप दिला कीं, कलियुगांत राजा विक्रम होईल त्याचें चरित्र भोजराजास सांगाल तेव्हां तुह्मांस आपलें पूर्व रूप प्राप्त होईल तो दिवस आज तुझ्या प्रतापानें आला तुझा आह्मावर फार उपकार झाला राजा, आतां तुला जो वर पाहिजे तो माग. तें ऐकून भोजराजा ह्मणाला जर तुह्मी प्रसन्न झालां तर ही कथा जो

लिहील अथवा वाचील किंवा श्रवण करील त्यास दरिद्रदुःखकधींही न-व्हावें. हाच वर द्यावा. ते ऐकून तथास्तु ह्मणून बत्तीस पुतळ्या दिव्य स्त्रि-या होऊन विमानांत बसून कैलासास गेल्या. नंतर भोजराजा तें सिंहासन पूर्व ठिकाणीं पुरून ठेवून आपलें सर्व राज्य प्रधानाचें स्वाधीन करून आपण तपश्चर्येस जाता झाला.

समाप्त.

---

हें पुस्तक मुंबईंत गोपाळ नारायण आणि कंपनी यांणीं आपले छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें. मिति वैशाख वद्य १३ शुक्रवार शके १८०९ सर्वजिन्नामसंवत्सरे. तारीख २० माहे मे सन १८८७.

# प्राकृत आणि संस्कृत ग्रंथ.

खालीं लिहिलेले ग्रंथ चांगल्या कागदावर मोठ्या सुंदर ठशांनीं आम्हीं छापिलेले विक्रीस तयार आहेत. प्रत्येक. ग्रंथाच्या दरएक अध्यायापूर्वी उत्कृष्ट चित्रें दिलीं आहेत, व प्रत्येक पृष्ठाखालीं कठीण शब्दांचे अर्थ दिले आहेत.

## प्राकृत.

| | | | |
|---|---|---|---|
| जैमिनी अश्वमेध | रु० ३-८ | दासबोध | रु० २-० |
| संतलीलामृत | २-० | हरिविजय | २-० |
| नाथलीलामृत | २-० | शिवलीलामृत | ०-१२ |
| पांडवप्रताप | ३-० | शनिमहात्म्य | ०-२ |
| भक्तविजय | २-८ | व्यंकटेशस्तोत्र | ०-१ |
| रामविजय | २-० | सिंहासनबत्तिशी | ०-४ |

## संस्कृत.

| | | | |
|---|---|---|---|
| वाल्मीकि रामायण, सटीक | रु० १४-० | सूर्यसहस्रनामावली | ०-२ |
| विष्णुसहस्रनाम | ०-१॥ | सुंदरकांड, वाल्मीकी रामायण | १-४ |
| विष्णुसहस्रनामावली | ०-२ | रामायणमाहात्म्य | ०-८ |
| धातुरूपावली | ०-३ | पौषमहात्म्य | ०-६ |